# एक गगनभेदी किंचाळी
## (दोन अंकी नाटक)

-- चं.प्र. देशपांडे

**अंक पहिला**

पडदा उघडण्यापूर्वी अनिश्चित आवाजात एक गगनभेदी किंचाळी. मग पडदा उघडतो. चाळीतले एक नेहमीसारखे घर. आनंदराव ( सुमारे ५०) नुकतेच कामावरून परत आलेले. भाजीची पिशवी, त्यांच्या सौभाग्यवती उषाताई ( सुमारे ४५) यांच्याकडे देतात. वीणा - त्यांची सुरेख मुलगी - ( सुमारे २१) कसले तरी पुस्तक वाचते आहे. सतीश ( सुमारे २५) आरशात बघून भांग पाडतो आहे. एकूण नॉर्मल वातावरण.

उषाताई : नेमकी पालेभाजी आणलीत ! तरी सकाळी सांगितलं होतं मी तुम्हाला, की निवडायची भाजी आणू नका.

आनंदरावः अग, दुसरी भाजीच नव्हती मंडईत. दुध्या होता तो जून होता, कोबी शिळी होती, टोमॅटो सडके होते, वांगी किडकी होती. राहता राहिलं सुरण. ते आपल्याकडं तुझ्याखेरीज कुणालाच आवडत नाही. घेण्यासारखी म्हणजे ही पालेभाजीच होती. शिवाय जरा स्वस्त. ( हे बोलत ते आत जातात.)

उषाताईः काहीतरी सांगता झालं - करावं लागतंय सगळं मलाच - मदत आहे का कुणाची. वीणाचा अभ्यास, सतीशचं बाहेर जाणं आणि तुम्ही दमून आलेले. मला काय कारण सांगता येतंय का ? ( - हे बोलत भाजीची पिशवी घेऊन आत जातात. आनंदराव आतून हातपाय धुऊन येतात. 'हुश्श' करून निवांत बसू लागतात -- इतक्यात बाहेर खूप गोंधळ,धावपळ. माणसे धावत येतात. एकाच्या तर हातात काठी. रंगभूमीवर दिसणाऱ्या माणसांच्या मागे आणखी खूप माणसे आहेत. प्रत्येकजण 'काय झालं ? काय झालं ?', 'अहो, केवढा आवाज तो', 'कोण किचाळलं?', 'एकदम जोराची किंचाळी ऐकू आली हो--' वगैरे म्हणत जमतात, गोंधळ, गडबड ऐकून आनंदराव बसायचा विचार सोडून उभेच. वीणाने पुस्तक ठेवलेले. सतीश गोंधळून उभा. दोनतीन माणसे घरात शिरतात.)

आनंदराव काय झालं ?

एकजणः अहो, तेच आम्ही विचारतोय तुम्हाला. इथं किंचाळलं कोण आत्ता ? केवढ्या जोरात किंचाळी ऐकायला आली --

दुसरा : सगळे धावत आलो आम्ही - काय झालं काय ? कोण ओरडलं ?

आनंदराव नाही बुवा. कुणी नाही. आमच्या घरात तर - म्हणजे इथं कुणी किंचाळलं नाही - आणि असं काही ऐकूही आलं नाही आम्हाला --

वाटवे : अहो, असं कसं म्हणतां आनंदराव, आम्ही तर याच मजल्यावर राहतोय की नाही - किंचाळी ऐकून आम्ही लगेच बाहेर आलो - तेवढ्यात खालून हे सगळे आले - किंचाळी तुमच्याच घरातून आली.

आनंदराव : छे -- नाही हो --

तिसरा : आम्ही तर बाहेर रस्त्यावरून चाललो होतो. इकडूनच आला आवाज --

आनंदराव : आणि मग आम्हाला कसं काही कळलं नाही ?आमच्याच घरातली किंचाळी आम्हाला ऐकू न येता नुसती बाहेर कशी ऐकू जाईल ? छे -- काही तरी गोंधळ झालाय तुमचा. मुळात, खरंच किंचाळी ऐकू आली का ?

एकजण : भले ! म्हणजे इतक्या माणसांनी ऐकली किंचाळी आणि धावत आले सगळे नेमके इकडेच -- म्हणजे सगळ्यांचं खोटं म्हणा --

दुसरा : आता तुम्हाला सांगायचं नसलं तर राहू द्या. पण हे बरं नव्हे --

सतीश : ( पुढे येऊन --) हे बघा, आमच्या घरातून काही कुणी किंचाळलेलं नाही-- तुम्ही दुसरीकडं कुठं बघा --

एकजण : भले ! तुमचंच तर कडेचं घर आहे या मजल्यावर, इथून पुढं कुठं ?

दुसरा : अहो असं कसं होईल ? तुमचं काही घरगुती असलं तर चालू द्या -- आमचं काही म्हणणं नाही --

तिसरा : किंचाळी ऐकली म्हणजे काहीतरी भयंकर प्रसंग आहे आणि दुसऱ्या माणसांची मदत हवी आहे असा अर्थ होतो हो त्याचा- म्हणून येतात माणसं पळत --(गर्दीत कुजबुज -- ' काय झालं ? ', 'इथनं कुणी ओरडलं नाही म्हणतायत,' ' म्हणजे हे सगळे पळत आले ते गाढवं म्हणां की --' वगैरे ) आता तुमचं सगळं ठीक आहे म्हटल्यावर काही प्रश्न नाही हो -- ( दरम्यान मंदार नामक एक तरुण येऊन-- काठी घेऊन आलेल्या माणसाजवळ उभा. याला पुढे फार महत्त्वाचे काम आहे. स्वतःचे अध्याहृत महत्त्व गृहीत धरूनच याचे नुसते निरीक्षण चालू आहे.)

गाडगीळ : बरं चला -- सगळं ठीक आहे -- चला -- ( माणसं जायला निघतात,तेवढ्यात विजय नामक चाळीतलाच एक तरुण इन्स्पेक्टरला घेऊन येतो.)

विजय : इकडे - इकडे - हे बघा - (इन्स्पेक्टर गर्दीतून पुढे येतो. विजय आपण महत्त्वाचे काम करून मोकळे झालो आहोत अशा आविर्भावात उभा.)

इन्स्पेक्टर : हं काय झालं ?

दुसरा : अहो कुठलं काय, काहीतरी झालं असंच वाटलं आम्हालाही - पण आता काहीच नाही म्हणतायत --

इन्स्पेक्टर ( काठीवाल्याकडे पाहून ) तुम्ही काठी घेऊन काय करताय ?

काठीवालाः काही नाही. साप किंवा चोर असला तर असावी, म्हणून आणली होती.

इन्स्पेक्टरः बरं, या घरातला माणूस कोण ?

आनंदराव मी --

इन्स्पेक्टरः हं -- काय झालं ?

आनंदरावः कुठं काय ?

इन्स्पेक्टरः नीट उत्तरं द्या माझ्या प्रश्नांची ! ( एवढ्यात आतून उषाताई --)

उषाताई : वीणे, आईला बरं नसल्यावर तरी जरा मदत करावी की ग -- ( हे बोलत येतात -- गर्दी, इन्स्पेक्टर पाहून बिचकतात. ) अं ? काय झालं ? ( आनंदरावांना ) काय झालं हो ?

आनंदरावः ( इन्स्पेक्टरला ) -- बघा ! हिलाही काही माहिती नाही. ही तरी आत्ता तुमच्यासमोरच आतून बाहेर आली की नाही ?

इन्स्पेक्टरः हे बघा, माझ्यासमोर हुशारी करायची नाही. उत्तरं द्यायची नुसती. फातलू फापटपसारा मला आवडत नाही.

आनंदरावः नाही. ते चांगलं आहे. पण आम्हाला काही माहितीच नाही तर उत्तरं कसली देणार ?

उषाताईः : अहो काय झालं तरी काय ? कसली उत्तरं द्यायची म्हणतायत ते ?

आनंदरावः आपल्या घरातून कुणीतरी किंचाळल्याचा आवाज आला असं सगळ्यांचं म्हणणं आहे. म्हणूनच हे इन्स्पेक्टरसाहेब आलेत.

उषाताईः : आपल्या घरातून ?

इन्स्पेक्टरः अहो बाई, तुम्ही जरा गप्प बसता का ? ( गर्दीला ) बरं, किंचाळी तुम्ही सगळ्यांनी ऐकलीत ना ? (सगळे ' हो हो ' करतात. तेवढ्यात गर्दीतून वाट काढत एक सुटाबुटातला माणूस पुढे येतो.)

सूटबूटवालाः मी काही किंचाळी ऐकली नाही . ही सगळी धावपळ बघितली म्हणून मीही आलो.

इन्स्पेक्टरः तुम्ही तिकडे मागेच उभे राहा. ( तो नर्व्हस होऊन जातो. आनंदरावाना --) तुम्ही माझ्या प्रश्नांची उत्तरं देताय की नाही ?

आनंद : माहिती नसली तर ' माहीत नाही ' असं म्हटलं तर चालतंय ना ?

सतीश : आम्ही काही उत्तरंबित्तरं देणार नाही. इथे काहीही घडलेलं नाही.

इन्स्पेक्टरः हे कोण ?

आनंदरावः हा मुलगा माझा.

इन्स्पेक्टरः ( सतीशला ) इथलं सगळं संपल्यावर चौकीवर यायचं माझ्याबरोबर.
( आनंदरावांना ) प्रश्न पहिला -- कोण किंचाळलं ?

आनंदरावः माहीत नाही.

इन्स्पेकटरः म्हणजे तुम्ही काही सहकार्य देणार नाही !

आनंदरावः अहो, आता मी खरं बोलतोय म्हणजे सहकार्यच देतोय की --

इन्स्पेक्टरः अस्सं ! ( गर्दीकडे वळून ) किंचाळी कुणी कुणी ऐकली ? ( बरेच लोक ' मी' ,' मी ऐकली,' ' आम्ही

ऐकली ' म्हणतात.)

सूटबूटवालाः ( पुढे येऊन-- ) काहीजण इथं किंचाळी प्रत्यक्ष न ऐकताही आलेले आहेत. जमल्यास काही मदत करावी एवढ्याच निरपेक्ष बुध्दीनं ते आलेले आहेत . सगळेच काही किंचाळी ऐकलेले नाहीत .

इन्स्पेक्टरः तुम्ही तिकडं मागे जा म्हणून सांगितलं ना ? घरी जा नाहीतर. ( सूटबूटवाला पुन्हा नर्व्हस होऊन जातो.) बरं, किंचाळी ऐकून आलेले जे आहेत, त्यांनी मला एक सांगा, आवाज स्त्रीचा होता की पुरुषाचा ?

काहीजणः स्त्रीचा --

काहीजणः पुरुषाचा --

दुसरा : बहुतेक स्त्रीचा असावा असं वाटतंय. पण आता निश्चित आठवत नाही. किंचाळीच एवढी प्रचंड होती की -- म्हणजे हे आवाजाचं लक्षातच राहिलं नाही.

इन्स्पेक्टरः बरं, निश्चित कुणी सांगू शकेल काय ?

वाटवे : मी निश्चित सांगतो. मी याच चाळीत, याच मजल्यावर राहतो, आवाज पुरुषी होता --

इन्स्पेक्टरः पुरुषी होता की पुरुषाचा होता ?

वाटवे : आवाज पुरुषाचा होता .

इन्स्पेक्टरः तुम्ही या घरातल्या मंडळींना किती वर्षं ओळखाता ?

वाटवे : खूप वर्षं --

इन्स्पेक्टरः मग आता मला सांगा, की तो आवाज कुणाचा असावा असं तुम्हाला वाटतं ? म्हणजे या मुलाचा की यांचा ?

वाटवे : तो यांचा -- म्हणजे आनंदरावांचा आवाज होता असं मला वाटतं. ( सगळे चकित. घरातले सगळ्यांत जास्त चकित. आनंदराव तर चकित, खलास आणि वर संतप्त. )

इन्स्पेक्टरः हं -- काय मग आनंदराव -- हे तर असं म्हणतायत -- कबूल का करत नाही तुम्ही ? तसंच काही घडलं असलं, तर माझी मदतच होईल तुम्हाला.

आनंदरावः अहो पण, हे खोटं आहे सगळं. कबूल कसं करणार ?

इन्स्पेक्टरः हे पहा, तुम्ही सभ्य समाजात राहणारे सभ्य गृहस्थ आहात. खरं ते कबूल करायला लावता येत आम्हाला -- पण मी तसं करणार नाही. तुम्ही स्वतःहून खरं बोललात तर बरं होईल.

आनंदरावः आता मी बोलतोय ते जर खरं नसेल, तर मला स्वतःलाच खोटं वाटतंय असं दुसरं काहीतरी बोलावं लागेल.

उषाताईः माझ्या हातून एक पातेलं पडलं मघाशी. त्याचा आवाज गेला असेल का ?

आनंदरावः तू जरा गप्प बसलीस तर बरं होईल. पातेली रोजच पडत असतात सगळीकडे. पातेल्याचं ते काय !

इन्स्पेक्टरः अहो पातेल्याचं काय म्हणू नका. तुमच्या घरातून कसलातरी आवाज झाला एवढं तरी मान्य झालं यात. आता ते पातेलं होतं का माणूस होता, ते पाहू आपण.

वाटवे : नाही, या उषाताई म्हणताहेत ते बरोबर आहे. पातेलं पडल्याचा आवाज आला पण तो नंतर आला. आधी किंचाळीचा आवाज आला. किंचाळी ऐकली म्हणून मी इकडे येत असताना पातेल्याचा आवाज आला.

इन्स्पेक्टरः म्हणजे इथं काही तरी घडत होतं हे नक्की.

आनंदराव अहो वाटवे, कशाला फालतू बडबड करताय ? उगीच -- कशाला वाढवताय उगीचच !

इन्स्पेक्टरः असं थांबवू शकत नाही तुम्ही त्यांना --

आनंदरावः अहो पण --

इन्स्पेक्टरः ते सगळं जाऊ द्या. तुम्ही स्वतः किंचाळलात की नाही तेवढं सांगून टाका म्हणजे झालं. उगीचच वेळ खाऊ नका माझा.

आनंदरावः मी स्वतः तर किंचाळलो नाहीच, पण दुसरंही कुणी किंचाळल्याचं मला ऐकू आलेलं नाही.

इन्स्पेक्टरः बरं ठीक आहे - चला - काही घडलेलंच नाही तर चांगलं आहे - ( जायला निघत-- ) बरं, इथं कुणाला काही तक्रार द्यायची आहे काय ? असा वेळ घालवू शकत नाही मी.

गर्दीतले : नाही -- आम्हाला काय करायचंय तक्रार करून ?
छे -- आपण कशाला तक्रार करायची ?
नाही - काही तक्रार नाही.

इन्स्पेक्टरः ( आनंदरावांना ) तुमची कुणाची काही तक्रार आहे ?

आनंदरावः नाही --

इन्स्पेक्टरः ठीक आहे. जातो मी. काही मदत लागली कधीही, तर कळवा मला -- अच्छा ! चला, चला, काय गर्दी करताय उगीच -- चला --

मंदार : ( पुढे येत ) मला द्यायचीय तक्रार. ( चाललेले लोक पुन्हा उभे. इन्स्पेक्टरही थांबतो. )

इन्स्पेक्टरः काय तक्रार आहे तुमची ?

मंदार : यांच्या घरातून किंचाळी ऐकू आली. पण शेवटी त्याचा काहीच छडा लागला नाही, त्यामुळं चाळीत आणि आजूबाजूच्या परिसरात भीतीचं वातावरण पसरलं आहे. तरी याचा योग्य तो शोध घेऊन लोकांना भीतीतून मुक्त करावं असं मला म्हणायचंय --

इन्स्पेक्टरः जाऊ द्या हो -- कुठाय भीतीचं वातावरण ? कशाला उगीच ?

मंदार : असं नाही. इतकी भयंकर गोष्ट घडल्यावर पोलीस डिपार्टमेंटनं याची दखल घ्यायला पाहिजे.

इन्स्पेक्टरः मग आता इतका वेळ दखल घेतोय नाही तर काय करतोय ?

मंदार : तसं नाही. छडा लागला पाहिजे त्याचा.

आनंदरावः ते वाटवे झाले, आता हा मंदार. अरे मंदार, कशाला उगीच ?अं ?

मंदार : तसं नाही नाना -- समजा, किंचाळी जर तुमच्या घरातून आलीच नसली, तर आली कुठून ?-- हा प्रश्न राहतो की नाही ? कळायला नको ?

इन्स्पेक्टरः बरं, ठीक आहे, चला चौकीवर. मी तुमची तक्रार लिहून घेतो. याचा छडा लावायचा आम्ही प्रयत्न करू. तुम्ही निर्धास्त राहा सगळे. शिवाय चौकी जवळच आहे. तुम्ही कधीही बोलवू शकता. अच्छा !( मंदारला ) चला -- ( इन्स्पेक्टर आणि मंदार जातात. गर्दीही हळूहळू पांगते. वाटवेही चाललेले --)

आनंदरावः अहो वाटवे, इकडं या जरा.

वाटवे : आता काय आणखीन ?

आनंदरावः अहो, काहीतरीच काय सांगत होता तुम्ही ? मी किंचाळलो ?

वाटवे : मी जे ऐकलं ते बोललो. तुम्हाला जे खरं वाटत होतं ते तुम्ही बोललातच की नाही ? मला खरं वाटलं ते मी बोललो.

आनंदरावः अहो, पण प्रसंग माझ्यावर होता -- मला बोलणंच भाग होतं.

वाटवे : प्रसंग चाळीवर होता असं मी समजतो. ( चाळीतली आणखी दोनतीन माणसं जाता जाता थांबून परत आलेली -- त्यांना --) अशी घटना चाळीत घडल्यानंतर आपल्याला सगळ्यांना हात बांधून बसता येईल का ? आणि आम्ही किंचाळी ऐकली ही खरी वस्तुस्थिती असताना ?

आनंदरावः आता तुम्ही म्हणताय की मीच किंचाळलो ! अहो, पण मी सांगतोय ना --मी तर नाहीच -- पण आमच्या घरातलं कुणीच किंचाळलं नाही .

वाटवे : ते कळलं हो आता.

एकजण : आश्चर्य आहे मात्र.

दुसरा : तर काय ! ही काय भुताटकी !

वाटवे : तसं काही भीतीचं नाही हे बरं झालं. पण जरा जपून राहा तुम्ही आनंदराव. कारण शेवटी किंचाळी तुमच्या घरातून आली होती. आम्ही आहोतच -- तसं भ्यायचं कारण नाही -- शेजारधर्म तो काय मग !

उरलेले दोघेः होय, होय.

वाटवे : आणि सतीश, तूही लक्ष देत जा जरा घरात, अं ! आणि इन्स्पेक्टर वगैरे लोकांना असं बोलू नये. असो. चला. बरंय.

आनंदरावः हं... तुमचा सगळ्यांचा आधार आहे म्हणून बरं आहे. हे गूढच घडलं एक --

वाटवे : असं नाही. आमच्या घरातून किंचाळी आली तर तुम्ही याल की नाही धावत ?

आनंदरावः वा -- नाही कसं ? येणारच --

वाटवे : झालं तर मग -- चला -- भाजी निवडत होतो हो -- ( तिघेही जातात. आता फक्त घरातली माणसे.)

उषाताईः : हे काय हो मधेच सगळं ?

आनंदारावः आता तू प्रश्न विचार !

सतीश : त्या मंदारकडं घेतो मी आता बघून ! तक्रार देतोय !

वीणा : जाऊ द्या ते सगळं आता. आला असेल कुठनं तरी आवाज. लोकांना वाटलं आपल्या घरातून. जाऊ द्या.

कळेल नंतर.

सतीश : तुझं हे नेहमीचं टाळाटाळीचं धोरण काही उपयोगाचं नाही इथं. इन्स्पेक्टरला बोलावून आणलं विजयनं. त्याच्याकडंही बघून घ्यायला पाहिजे एकदा. काय झालंय ते बघायच्या आधीच आपलं सरळ इन्स्पेक्टर म्हणजे काय !

वीणा : नुसतं ' बघून घेतो ' ' बघून घेतो ' काय ? काय करणार तू त्यांना ?

उषाताई : भांडू नका रे ! मी काय म्हणते, की त्यावेळी आपल्या घरातून कसले कसले आवाज झाले ते आठवून बघू या बरं आपण --

आनंदराव समज ॲटमबॉम्ब फुटला असेल इथं ! पण कुणी किंचाळलं नाही हे तरी नक्की आहे की नाही !उगीच काय गाढवासारखं --

उषाताई : तसं नाही हो -- पण किंचाळीसारखा वाटणारा काही आवाज झाला काय आपल्याकडे -- हे कळलं तर सांगता नाही का येणार सगळ्यांना --

आनंदरावः तो वाटव्या म्हणतोय मीच किंचाळलो -- तू म्हणतीयस पातेलं पडलं --पातेलं पडल्याचा आवाज मी किंचाळल्यासारखा कसा येईल ?

उषाताई : अहो, पातेलं नंतर पडलं -- किंचाळी आधी ऐकू आली --

आनंदरावः तो वाटव्या बोलतोय तसंच बोल तू ! तू ऐकलीस का किंचाळी ?

उषाताई : अहो तसं नव्हे -- मी काय म्हणतेय ते समजून तरी घ्या -- पातेलं पडायच्या आधी कसले कसले आवाज झाले ?

आनंदरावः एक म्हणजे मी 'हुश्श' म्हणालो - दुसरं, हा सतीश भांग पाडत होता, त्याच्या केसांचा आवाज आणि तिसरं, वीणानं पुस्तकाचं एक पान उलटलं तो एक आवाज -- बस्स ! यातला कुठला आवाज माझ्या किंचाळीसारखा आहे ?

उषाताई : अहो, पण तुम्ही स्वतःवरच कशाला घेताय सगळं ? आम्हा तिघांपैकी कुणी नसेल कशावरून ? ( इथं सतीश पुढे येतो आणि आईला सरळ दंडवत घालतो.) अरे, हे काय सतीश ?

सतीश : ( उठून उभा राहत-- ) तुझा हेतू स्तुत्य आहे आई, पण असं पुन्हा कुठे बोलू नकोस -- नाना एक किंचाळले म्हणून त्यांची बेअब्रू झालीय तेवढी पुरे.

आनंदरावः म्हणजे आमची काहीच किंमत नाही ! नानांची होऊ द्या बेअब्रू ! यांची नको !

सतीश : मग काय तुमच्यावरचा हा किंचाळल्याचा डाग धुऊन काढण्यासाठी मी किंचाळलो असं सांगू का सगळ्यांना ?

आनंदरावः नको रे बाबांनो. पण कुणीच किंचाळलं नाही एवढंच खरं बोलत राहा की !

वीणा : ते तर आहेच हो नाना. पण समजा, आईवर किंवा माझ्यावर आला असता हा प्रकार तर सगळ्या लोकांनी आमच्याकडे बघत राहणं - प्रश्न विचारणं - आम्हाला चौकीवर जावं लागणं - हे कसं झालं असतं ?

आनंदरावः अरे पण, मला का ताप आता या पन्नाशीत ? सात-आठ वर्षांत रिटायर होतोय मी -- या सतीशनं काही जबाबदारी घ्यायला नको घरातली ?

सतीश : (ओरडतो) अहो, जबाबदारी म्हणजे मी किंचाळलो असं म्हणू का ?

आनंदरावः हळू, हळू ! हळूSS। ओरडू नकोस. पुन्हा येतील पळत सगळे. मला वाटतं ही आपसातली चर्चा बंद करू या आपण -- तुम्ही तिघंही अर्धवट डोक्याची माणसं आहात -- खरंच किंचाळाल कुणीतरी --

उषाताई : अहो, तुम्ही पूर्ण डोक्याचे ! पण नाव तुमचंच प्रसिध्द झालंय. नेमकं कसं तुमचंच नाव घेतलं वाटव्यांनी ?

आनंदरावः तुम्हा लोकांचा परधार्जिणेपणा काही जायचा नाही. तिकडनं येऊ दे एक किंचाळी, मग काढतो बरोबर वचपा त्या वाटव्याचा !

उषाताई : अहो, पण ते किंचाळलेच नाहीत कधी, तर कशी येईल तिकडून किंचाळी ?

आनंदरावः मग काय मी किंचाळलो होतो असं तुझं म्हणणं आहे काय ?

उषाताई : तसं नाही हो --

आनंदरावः नाही ; असलं तर सांग. मघाशी सतीशनं एक दंडवत घातलाच आहे तुला; आता मी एक घालतो.

उषाताई : ( चिडून आणि डोळ्यांत पाणी आणत ) माझं मेलीचं असंच व्हायचं. प्रेमानं काही बोलायला जावं, तर दर खेपेला तुम्ही चिडूनच बोलणार -- ( आत जातात. )

आनंदरावः नको ऽ नको ऽऽ तुमचं प्रेम नको आम्हाला ! कृपा करा ! जरा धडपणे जाऊ द्यात उरलेले दिवस ! जे काय असतील तेवढे !--

वीणा : तुम्ही तरी कशाला इतकं चिडताय नाना ?

आनंदरावः ( जोरात ) अग, मग चिडू नको तर -- ( लक्षात येऊन एकदम आवाज खाली आणून ) काय करू ? अं ? ( वीणा हसते.) हसू नकोस.

वीणा : उगीचच धसका घेतलाय तुम्ही नाना - तो इन्स्पेक्टर आला म्हणून घाबरलात तुम्ही !

आनंदरावः हे एवढं एक बोलायचं राहिलं होतं ! लहान मुलाइतकीसुध्दा किंमत ठेवू नका माझी घरात ! आणि तो मंदार एक शहाणा गेलाय तक्रार नोंदवायला ! धन्य ! परमेश्वरानं नेमकी सगळी अक्कलवान माणसं पेरून ठेवलीयत माझ्या अवतीभवती ! छान ! म्हणजे हे संपल असतं की नाही इथल्या इथं - पण नाही - तक्रार ! चालू ठेवा सगळं !

सतीश : बरं दुसऱ्यांच्या अकलेचं जाऊ द्या - तुम्ही आता काय करायचं ठरवलंय ?

आनंदरावः ( अजून चिडलेलेच. ) किंचाळायचं ठरवलंय ! होऊन जाऊ द्या तुमच्या मनासारखं !

सतीश : नाना, चिडून उपयोग नाही - हा सगळा प्रकार निस्तरावा लागणारच आहे आता. तेव्हा काही तरी धोरण ठरवायला नको का ?

आनंदरावः धोरण कसलं आलंय ! काही झालंच नाही - काही घडलंच नाही - असंच आपण वागायचं - कुणी विचारलं तर, आमच्या घरात तरी कुणी किंचाळलेलं नाही हेच सांगत राहायचं --

सतीश : अहो, पण असं केल्यामुळं जास्तच शंका येणार लोकांना --

आनंदरावः मग काय करावं म्हणतोस ?

सतीश : आपण असं करू या.

आनंदरावः हं --?

सतीश : आपण असं सांगायचं की त्यावेळी तुम्हाला जोरात शिंक आली होती आणि तो आवाज लोकांना किंचाळीसारखा वाटला.

आनंदरावः अरे,पण इतक्या जोरात शिंकतो का मी कधी ?

सतीश : पण ती शिंक होती तशी !

आनंदरावः छान ..! तो वाटवे म्हणतोय मी किंचाळलो, ही म्हणतेय पातेल पडलं --तू म्हण मी शिंकलो -- म्हणा -- काय जे आरोप करायचे ते करून घ्या आत्ताच जिवंत आहे तोवर - एकदा मेलो म्हणजे मग, आरोप करायला माणूस नाही सापडायचा तुम्हाला ! आमचे नाना शिंकले नाहीत -- आपलं किंचाळले नाहीत -- असं ठामपणं सांगणारं एक माणूस असू नये घरात !

वीणा : अहो, आम्ही तेच म्हणतोय नाना - पण लोकांना पटायला नको का ? लोक म्हणणार -- घरातलीच माणसं, ती कशाला कबूल करतील ? आणि लोकांना असं वाटणंही बरोबरच नाही का एका दृष्टीनं ?

आनंदरावः अग, लोकांचं बरोबर - चूक हे काही नकोय -- काही गरज नाहीय त्याची । तुम्ही फक्त खरं बोला म्हणजे झालं ।

वीणा : एक आश्चर्यच आहे मात्र ! सगळे नेमके आपल्याच घराकडे कसे आले धावत ? आणि आपल्याला कसं काहीच ऐकू आलं नाही ?

आनंद : बरं, शहाणी आहेस. बस्स झालं आता. अभ्यास कर तुझा - उगीच नसता ताप एकेक -- ( वर्तमानपत्र घेऊन खुर्चीत बसतात. वीणा जाऊन वाचत बसते.)

सतीश : बरं, मी बाहेर जाऊन येतो जरा --

आनंदरावः हं. जा - एखाद दिवशी खरोखर जरी किंचाळलो तरी बाहेर जायचं काही थांबायचं नाही तुझं -- जा -- (सतीश जात असतो तेवढ्यात मंदार येतो.) या ! फार छान काम करून आलात ! या ! ( सतीशही आत येतो. ) काय नडलं होतं तक्रार नोंदवायचं ?

मंदार : मला वाटलंच होतं की तुम्ही असं म्हणणार. पण माझा हेतू तुम्ही लक्षात घेतलेला नाही.

आनंदरावः सांगा !

मंदार : किंचाळी तुमच्या घरातून आली नाही याबद्दल माझी खात्री आहे. पण ती कुठून आली हे कळल्याशिवाय लोकांची खात्री पटेल का ? मी जर ही तक्रार दिली नसती तर पोलीस डिपार्टमेंटनंही दुर्लक्ष करून टाकलं असतं. आता निदान त्यांना शोध घ्यावा लागेल.

आनंदरावः हं -- हे जरा पटण्यासारखं दिसतंय तुझं --

मंदार : पण माझा आणखी एक उद्देश होता --

आनंदरावः तो कोणता ?

मंदार : पोलीस डिपार्टमेंटला न उलगडणारी रहस्यं स्वतःच्या हिमकतीनं शोधून काढणारे नायक तुम्ही नुसते पुस्तकात वाचलेत --

आनंदरावः आता मी असली पुस्तकं वाचतो असा तू एक आरोप कर !

मंदार : तुम्ही म्हणजे तुम्ही नव्हे हो -- कुणीही ! तर तो पुस्तकातला नायक मी तुम्हाला प्रत्यक्षात दाखवणार आहे ! मी याचा रहस्यभेद करायचं काम हातात घ्यायचं ठरवलेलं आहे ! परंतु एरवी तुम्हाला माझ्या कामाचं महत्त्व कळलं नसतं, म्हणून डिपार्टमेंटलाही मी माझ्या तक्रारीच्या रूपानं एक आव्हान देऊन ठेवलेलं आहे. आणि मला खात्री आहे की, त्यांच्या हातून हा रहस्यभेद होऊ शकणार नाही.

आनंदरावः कारण ते तुझ्या तक्रारीत लक्षच घालणार नाहीत.

मंदार : नाही -- तसं नाही -- लक्ष घालतील -- पण त्यांना ते जमणार नाही.

आनंदरावः तुला जमेल !

मंदार : होय ! जमेलय ! मी हे मनावर घेतलेलं आहे. काय म्हणून तुम्हाला नाहक मनस्ताप व्हावा ? तुमच्यासाठी मी कोणताही धोका पत्करायचं ठरवलेलं आहे.

आनंदरावः काही जरूरी नाही. तुला ती पोलिसांना हरवायची वगैरे हौस असली तर, पत्कर जा तिकडं. धोका पत्करतोय !

मंदार : कुठल्याही चांगल्या कामाची सुरुवातीला कुचेष्टाच होत असते. तुमचं तरी काय चूक आहे ? काय सतीश, तुझं काय म्हणणं आहे ?

सतीश : आवाज कुठून, कसला आला ते शोधलं पाहिजे हे तुझं पटतंय मला.

मंदार : बस्स् ! तू माझा साथीदार ! काढू शोधून ! डरो मत ! येतो मी नंतर -- बरंय नाना ! ( जातो. )

सतीश : मी येतो एक अर्ध्या तासात -- (जातो. )

वीणा : या मंदारला कुणी हुशारी करायला सांगितली आहे ? !उगीचच शहाणपणा करतोय, नाही का हो नाना ?

आनंदरावः आता सांगायचं कुणी ? घरात तुम्ही ही असली माणसं -- आणि बाहेर ती तसली माणसं ! शेवटी खरंच किंचाळी फुटणार माझ्या तोंडून असं वाटायला लागलंय मला !

मोरेकाकाः ( वय ६५, प्रवेश करत ) अहो, काय आनंदराव, काय ऐकतोय मी हे ? झालं तरी काय ? अं ? किंचाळलात म्हणे तुम्ही ? आत्ता बाहेरून आलो तर हे ऐकतोय ! सगळीकडे तीच चर्चा चाललीय !

आनंदरावः तुम्हाला खरं वाटतं का हे मोरेकाका ?! अहो, आयुष्याची पन्नास-बावन वर्षं ज्यानं हूं का चूं न करता काढली, त्याला आता किंचाळायचं काय कारण आहे, सांगा बरं !

मोरेकाकाः मलाही खरं वाटेनाच हो ते ! इतके सहनशील तुम्ही -- म्हटलं असं होणार नाही.

आनंदरावः त्या वाटव्यानं उठवलंन सगळं !

मोरेकाकाः तसं नव्हे -- बरीच माणसं गोळा झाली होती असं ऐकलं -- इन्स्पेक्टरही आला होता म्हणे -- दुसरं कुणी किंचाळलं काय घरातलं ?

आनंदरावः अहो, आमच्या घरातलं तर कुणी किंचाळलं नाहीच - पण आम्हाला अशी काही किंचाळी ऐकूही आली नाही.

मोरेकाकाः हं ! हे जे तुम्ही म्हणताय ना त्यामुळं संशय वाढतोय बघा. अहो, इतक्या लांबून लांबून माणसं आली धावत आणि तुम्हाला तेवढी किंचाळी ऐकू येत नाही हे काय गौडबंगाल आहे ! हे खरं वाटण्यासारखं नाही.

आनंदरावः मग काय आम्हालाही किंचाळी ऐकू आली, पण आम्ही तिकडे लक्ष दिलं नाही असं म्हणू का मोरेकाका ? अहो, आम्हाला काही माणुसकी आहे की नाही ?

मोरेकाकाः घरगुती काही वादविवाद चालला होता काय ?

आनंदरावः अहो, कसला वादविवाद मोरेकाका ? घरासारखं घर ! एवढं किंचाळण्यासारखं काय होणार आहे ! ही आत स्वयंपाक करत होती -- वीणा वाचत बसली होती -- मी नुकताच आलो होतो कामावरून -- आणि सतीश बाहेर जायच्या तयारीत होता. हे असं एकूण वातावरण होतं. यात आता कुणी का असेना -- किंचाळण्यासारखं काय आहे ?

मोरेकाकाः वहिनींना स्वयंपाक करताना कुठं भाजलं - कापलं तर नाही ना ?

आनंदरावः वीणे, आईला बोलाव.

वीणा : ( बसल्या बसल्याच ) ए ऽ आई ऽ ऽ

आनंदरावः हळू, हळू -- किंचाळू नकोस अशी.

उषाताईः : ( प्रवेशून ) काय ?

आनंदरावः हे मोरेकाका आलेत. ते म्हणतायत की, स्वयंपाक करताना तुला कुठं तरी भाजलं -- कापलं असेल म्हणून तू ओरडली असशील. तुझी बोटंबिटं दाखव त्यांना सगळं.

उषाताई : अहो, रोज भाजून-कापून कसं होईल ? एखादे वेळेस अतीच झाला मनस्ताप, तर होतं असं कधीकधी दुर्लक्ष झाल्यामुळं -- पण आज काही तसं झालेलं नाही

मोरेकाकाः बरं, ही वीणा कसलं पुस्तक वाचत होती ? रहस्यकथाबिथा नव्हती ना ?

वीणा : नाही हो काका -- ना.सी फडक्यांचा ' पोरखेळ ' वाचत होते -- लघुनिबंध हा एक विषय आहे आम्हाला-

मोरेकाकाः आणि सतीश कुठं गेला ?

आनंदरावः बाहेर ! पण मोरेकाका, तो कसा आहे ते माहीतच आहे तुम्हाला. तो दुसऱ्यांना किंचाळायला लावेल ;पण तो स्वतः किचाळणं ? शक्यच नाही ! -- त्याची शंकाच घेऊ नका तुम्ही !

मोरेकाकाः कमाल आहे बुवा ! विचार केला पाहिजे याच्यावर -- मलाही अंदाज लागत नाहीय.

स्त्रीचा आवाजः ( सौ. गाडगीळ ) :( बाहेरून ) अहो उषाताई, इकडे या हो जरा--

उषाताई : आले हं --

आनंदराव आले हं काय -- थांबा -- ( बाहेर बघत ) उषाताई येत नाहीत आत्ता -- इथून कुणी किंचाळलं नाही -- बाकीचं उद्या दुपारी विचारा तिला -- आत्ता त्रास दिला नाहीत तर बरं होईल --( ती स्त्रीही जाते आणि मोरेकाकाही निघतात.)

उषाताई : असं इतकं हे करायचं काही कारण नव्हतं -- ( आत जातात. )

मोरेकाकाः बरं, निघतो मग -- तुम्हाला त्रास झाला असला तर माफ करा. असं काही भयंकर झालेलं असलं की चौकशीला येतात हो माणसं ! असो. बघू.

आनंदरावः तुम्हाला पटलंय ना आता मोरेकाका ?

मोरेकाकाः पटण्या न पटण्याचा प्रश्न नाही हो -- खरं काय घडलंय ते कळलं पाहिजे. बघू. ( जातात.)

आनंदरावः वीणे, दार लावून घे ते -- उगीच एकेक एकेक येत बसतील सगळे --डोक्याला ताप नको -- आहे तेवढं पुष्कळ आहे. आता कुणाला घरात घ्यायचं नाही. ( वीणा उठून दार लावते आणि वळते. तेवढ्यात दाराची कडी वाजते.):

वीणा : ( परत दाराजवळ जाऊन ) आमच्या घरातून कुणी किंचाळलं नव्हतं -- जास्त माहिती उद्या मिळेल -- सारखं तेच तेच बोलत बसायला आम्हाला वेळ नाही --

सतीश : ( बाहेरून ) अग, वीणे, मी सतीश आहे, उघड दार. ( ती दार उघडते. सतीश आत येतो.) हे काय वेड्यासारखं चालू केलंय नवीन ?

वीणा : नानाच म्हणाले, कुणाला घरात घ्यायचं नाही --

सतीश : अरे पण, म्हणजे मला --

वीणा : ( चिडून ) आता मला काय माहीत की, तू आलायस म्हणून ?

सतीश : बघितल्याशिवाय बोलू नये असं. समजा नानांच्या ऑफीसतला साहेब आलेला असला काही कारणानं, तर असंच करणार काय तुम्ही ? म्हणजे ज्यांना माहीत नसेल त्यांनाही माहीत करून देणार तुम्ही ! आणि मग त्यांच्या प्रश्नांची उत्तरं देत बसणार !

आनंदरावः बरं, ते असू दे सगळं -- दार घ्या लावून ! ( वीणा सतीशकडे बघते आणि मग जाऊन दार लावून घेते.)

उषाताईः : ( प्रवेशून ) बरं तुम्ही आता जेवायला येणार आहात की, नुसतंच किंचाळी किंचाळी करत बसणार आहात ?

आनंदरावः हं -- चला ! जेवून घेऊ एकदाचं. म्हणजे एक हिची तरी कटकट मिटेल --

उषाताई : ( फणकाऱ्यानं आत जात ) जेवा, नाही तर नका जेवू -- मला काय त्याचं -- प्रत्येक गोष्टीची कटकट ! जरा काही बोललं की कटकट ! ( जातात. )

आनंदरावः हं चलारे बाबांनो-- जेवून घेऊ या ! ( सगळे आत जायला लागतात, तेवढ्यात दाराची कडी वाजते.)

दोन घास गिळूसुध्दा द्यायचे नाहीत साले ! ( सतीशला ) हं -- बघ - जा - कोण आहे बघ -- उघड दार -- ( सतीश जाऊन दार उघडतो. मंदार येतो.)

मंदार : हं -- चला -- आता लगेचच कामाला लागायचं आपण -- जेवणबिवण करून आलोय मी --

आनंदरावः मग आता आम्ही जेवू का नको ?

मंदार : तुमचं व्हायचंच आहे होय अजून ! सॉरी ! हरकत नाही. फक्त दोन मिनिटांचं काम आहे.( खिशातून टेप काढतो. ) तुमच्या खोल्यांची मापं घ्यायची होती जरा. सतीश, प्लीज धर बरं जरा -- हं --

सतीश : मला याच्यात काही इंटरेस्ट नाही. तुझं तू बघ --

आनंदराव बरं मी धरतो-- आण इकडं -- आणि तुम्ही तरी जा आत जेवायला -- नाहीतर पुन्हा ओरडणार ती आतून --( सतीश आणि वीणा आत जातात.) बरं, ही मापं घेऊन काय करणार बाबा तू ?

मंदार : ते तुम्हाला काय करायचंय ? -- धरा तुम्ही -- ( मापे घ्यायचे काम सुरु) काय आहे, की सुरुवातीला याचं महत्त्व कळत नाही कुणाला. रहस्यभेद झाल्यावर कळतं. हं, आता तिकडं धरा --(ते माप बघून झाल्यावर) हं ठीक -- आत चला आता -- ( आत जातात, आतच -- ) तुमचं हे घर जमिनीपासून सतरा फूट उंच आहे -- भिंतींची आतली उंची तेरा फूट आहे --आणि ही आता आपण खोल्यांची मापं घेतोय -- म्हणजे माझी प्राथमिक माहिती तयार झाली --

आनंदरावः होय, पण हीही मापं तू तुझ्याच घरात घेतली असतीस, तर चाललं असतं की -- घरं सारखीच आहेत आपली.

मंदार : तसं नाहीय नाना. प्रत्यक्ष लोकेशनचा अभ्यास करावा लागतो -- एक इंचाचा फरकसुध्दा काही वेळा महत्त्वाचा ठरतो.

आनंदरावः ( बाहेर येत--) अरे, लोकेशन हे नव्हे आणि या मापांवरनं किंचाळी कुठून आली हे कसं कळणार तुला --

मंदार : ( बाहेर येत) ते मी आत्ता सांगत नाही -- नंतर कळेलच तुम्हाला -- बरंय -- जातो मी --

आनंदराव : हं -- बरंय --( मंदार जातो. आनंदराव दार लावून आत जाता जाता ) म्हणजे समुद्रात पोहत असताना कुणी किंचाळलं, तर हे समुद्राची मापं घ्यायला जाणार टेप घेऊन ! ( आत जातात. काही क्षण अंधार, संगीत. पुन्हा प्रकाश पडतो, तेव्हा जेवणं झालेली आहेत. आनंदराव सुपारी कातरून तोंडात टाकतात. वीणा पुन्हा वाचत बसलेली.सतीश निवांत पडलेला.)

वीणा : तो किंचाळीचा विचार काढून टाका तुम्ही आता नाना डोक्यातून. आपण कशाला कोण किंचाळतोय ?

आनंदरावः मी किंचाळणं शक्यच नाही कुठल्याही परिस्थितीत, हे पुराव्यानं सिध्द करू शकतो ग मी -- पण तुमचा कुणाचा भरंवसा देता येत नाही --

वीणा : आम्ही कशाला किंचाळतोय -- आम्ही मजेत आहोत --

आनंदरावः मजेत नसायला काय झालं -- बाप करतोय इकडं हाडाची काडं -- पोरं मागं लागतायत तुझ्या, चेष्टा करतायत, हसणं, खिदळणं -- मजेत नसायला काय होतंय तुला --

सतीश : ( पडल्या पडल्याच ) नाना, तो वीणेचा विषय नको आता -- त्यापेक्षा किंचाळीचा विषय परवडला.

आनंदरावः तुझं एकदा हे बीएचं शेवटचं वर्ष संपलं की, उजवून टाकतो -- म्हणजे मोकळा झालो --

उषाताई : ( हात पुसत बाहेर येत ) मघापासून विचार करतेय मी -- मला असं वाटतं की, मीच किंचाळले असेन एखादे वेळेस -- ( सतीश ताडकन उठून बसतो --) आणि माझ्या प्रत्येक गोष्टीकडे दुर्लक्ष करायची वृत्ती आहेच तुमची सगळ्यांची -- त्यामुळं तुम्हाला ऐकू नसेल आली ती किंचाळी --

सतीश : आई, मघाशी एकदा नमस्कार केलाय नं तुला ? किती नमस्कार घालायला लावणार आहेस एका दिवसात ?

आनंदरावः तू किंचाळली असशील हे तुला एक वाटतंय ग -- पण काय झालंय काय तुला किंचाळायला ? फार मोठ्या दुःखाची काही बातमी कळली, का अचानक भीतीदायक असं काही दिसलं ?

उषाताई : पण खूप दिवस साठत साठत आलेलं दुख असलं, तर कुठं तरी स्फोट होऊन किंचाळणार नाही माणूस?

आनंदरावः कसलं दुःख ? ( स्वरात तिरस्कार ) मी दुःखी - मी दुःखी -- काय लावलंय हे !

उषाताई : हेच तुम्ही लावलं, की चालतं - आमच्या दुःखाला काही किंमतच नाही --

आनंदरावः आता कृपा करून असलं काही बाहेर बोलू नका कुणी ! आधीच आपल्या घराचा संशय आहे लोकांना --

वीणा : मंदारला काही उलगडलं तर बरं होईल .

आनंदरावः मंदारचा जास्त विचार करत बसू नकोस आता -- ते एक उद्‌भवायचं आणखीन --

सतीश : तिचा कशाला विचार करताय तुम्ही नाना -- कशी का वागेना -- मरेना का ती --

वीणा : मी कशाला मरतेय ! चांगली जिवंतच राहणार आहे मी -- एकदा लग्न होऊन गेले दुसऱ्या घरी, म्हणजे बरं होईल -- या घराचा अगदी वीट आलाय मला --

सतीश : मग आत्ताच जा की -- कुणी अडवत नाहीय तुला --

उषाताई : सतीश, गप्प बस हं तू -- उगीच काहीतरी बोलू नकोस --

आनंदरावः त्या मंदारला पुन्हा येऊ देऊ नका आता -- या वीणेचीसुध्दा मापं घेऊन जाईल तो -- आपल्या डोळ्यांदेखत --

उषाताई : ई ऽ ऽ काय घाणेरडं बोलता हो स्वतःच्याच मुलीबद्दल ! सर्पाची जीभ आहे तुमची !

आनंदरावः दात पण सर्पाचेच आहेत एवढं लक्षात ठेवा तुम्ही ! अजून कुणाला दंश केलेला नाही मी इतक्या वर्षांत-- दंश करण्यासारखे प्रसंग काही कमी आले नाहीत --

उषाताई : आम्हीच आणले प्रसंग सगळे -- सगळे आमचेच दोष होते --

सतीश : घरात काही स्वस्थता मिळायची नाही -- मी मित्राकडे जातोय जरा -- नोकरीसाठी अर्ज टाकायचेयत, ते तयार केले पाहिजेत -

आनंदरावः हं, जा जा -- घर सगळ्यांनाच नकोसं झालंय -- माझ्यासाठी राहिलाय तुम्ही सगळे घरात. जा. ज्याला ज्याला जाता येईल ते जा --

उषाताई : सतीश, हे तुझं रोजचं एक-दीडला परत येणं बंद कर बाबा आता. आम्हाला काही झोपबीप आहे की नाही ?

सतीश : ठीक आहे. लौकर येता आलं नाही, तर मी झोपायला त्याच्याकडेच थांबणार आहे. मला काही त्रास द्यायची हौस नाही.( जातो.)

आनंदरावः वीणे, दार लाव जा. जरा समोर दिसलं की, विचारणार पुन्हा कुणीतरी --

वीणा : दार लावणं आणि उघडणं हे एक कामच होऊन बसलंय माझं -- ( असं म्हणत जाऊन दार लावते. पुन्हा येऊन पुस्तक घेऊन बसते.)

उषाताई : तुमचा चिडचिडा स्वभाव मुलांमधे उतरलाय नेमका. स्वतःला धड काही जमलं नाही आयुष्यात आणि दुसऱ्यांवर चिडचिड करत बसायचं.

आनंदरावः जमलं काय नाही ? काय जमलं नाही ? सत्तावीस वर्षं झाली आपलं लग्न होऊन -- तुझ्याबरोबर इतकी वर्षं काढली हे काय थोडं जमलंय !

उषाताई : पण मधे एक भानगड करायचा प्रयत्न करून !

आनंदरावः त्याही विषयांची चर्चा करा मुलांपुढंच ! कुठं काही शिल्लक राह्यला नको !

उषाताई : मुलं काही लहान नाहीत आता --

आनंदरावः मला पण तुझं काही वागणं खटकलं असेल की नाही ? पण काढतो का मी ते कधी मुलांसमोर ?

उषाताई : माहिताय तुमचं ते ! काहीतरी खुसपट काढत बसायचं ! पहिल्यापासून संशयी स्वभाव मेला !

आनंदरावः ( ओरडतात ) अग, आता बास कर म्हणतोय ना ? डोकं आपटू का तुझ्यासमोर !

वीणा : नाना, किंचाळू नका की असे -- पुन्हा माणसं जमली म्हणजे --

आनंदरावः आता ते एक लक्षात ठेवायला पाहिजे सारखं -- माझ्यावरच रोख आहे सगळ्यांचा !

वीणा : तसं म्हटलं तर, आम्हालाही जपूनच राहायला पाहिजे -- किंचाळी स्त्रीच्या आवाजात होती असं काहीजण म्हणत होतेच --

आनंदरावः तुझ्यावर तर खूपच जणांचा रोख आहे ग -- त्यात प्रश्नच नाही --

वीणा : पण आम्हाला मुळात असली ओरडायची सवयच नाहीय म्हणा !

आनंदरावः सगळ्या ज्या काही सवयी असतील त्या मलाच आहेत बघ !

वीणा : जाऊ द्या -- मी आपली आतल्या खोलीत बसते वाचत -- इथं काही वाचून व्हायचं नाही --

आनंदरावः होय -- पण आतल्या खोलीची समोरची खिडकी बंद करून घे -- नाहीतर पलिकडच्या खिडकीतून खाणाखुणा सुरू झाल्या म्हणजे, तिथंही व्हायचं नाही वाचन-- ( वीणा जाते.)

उषाताई : किती सांभाळत बसणार आहात तुम्ही तिला ? -- करेना का काहीही. तिच्या नशिबाची ती.

आनंदरावः तसं नाहीय ते -- तुमच्या नशिबाचे फटके आणि धक्के मलाही बसतायत -- हे किंचाळीचं एक नाही

आलं अंगाशी ?

उषाताई : ते काही आमच्या नशिबामुळं नव्हे -- ते तुमचंच नशीब ! धड वागायचं नाही कुणाशी, मग असंच होणार !

आनंदरावः म्हणजे त्या वाटव्याशी मी मैत्री ठेवायला पाहिजे होती असं तुझं म्हणणं; का, तर किंचाळीच्या वेळी त्यानं माझं नाव घेऊ नये म्हणून ! काही जरूर नाही ! तो लाख म्हणेल -- पण मी किंचाळलेलो नाही हे सत्य आहे.

उषाताई : तुम्ही लाख म्हणाल हो, हे सत्य आहे म्हणून. पण लोकांना शेवटी कुणाचं पटतंय तेच महत्त्वाचं आहे.

आनंदरावः अगदी घरातल्या माणसांसकट सगळं जग जरी म्हणालं ना, की मीच किंचाळलो म्हणून, तरी ओरडून ओरडून मी एकच गोष्ट सांगत राहीन, की मी किंचाळलेलो नाही हे सत्य आहे आणि हेच फक्त सत्य आहे.

उषाताई : रामशास्त्र्याचे अवतारच तुम्ही ! रामशास्त्री एक सचोटीचा, सच्छील आणि खरा सत्यवादी म्हणून प्रसिध्द तरी होता -- तसं कुठाय तुमचं ?

आनंदरावः रामशास्त्री गेला --आपला राहिला इतिहासात ! इथं मी आहे -- मी ! जिवंत ! हाडामांसाचा !

उषाताई : तुमचं हाडमांस घेऊन काय चघळायचंय लोकांना ! उपयोग काय त्याचा ? आहे काही वजनदारपणा त्याच्यात ?

आनंदरावः हे आता तू भलतंच बोलायला लागलीस हं -- जीभ मोकाट सुटत चाललीय तुझी ! पस्तावशील नंतर !

उषाताई : काय कराल ? अशा धमक्या वर्षानुवर्षं ऐकतेय मी ! पाहिल्यापहिल्यांदा ' हाकलून देईन ' नंतर' 'आत्महत्या करीन ' आणि हल्ली ' घरातून निघून जाईन ' ! सत्तावीस वर्षं नुसते धमक्या बदलत राहिलात तुम्ही ! याशिवाय काय केलंत ?

आनंदरावः आज मी नाजुक परिस्थितीत सापडलोय ना -- त्याचा फायदा घेणारच तू ! अशा वेळी आपल्या माणसाला सावरून घ्यावं -- हे नाही करणार तू !

उषाताई : ( हुंदके देत ) असं कसं म्हणता तुम्ही ? माणूस मरमर मरतंय ते दिसतच नाही तुम्हाला ! त्या इन्स्पेक्टरनं दम भरला तुम्हाला -- लोक तुमच्याकडे संशयानं बघत होते -- तेव्हा किती वाईट वाटलं मला ! मन काय उघडं करून दाखवता येतं का ! ( डोळे पुसतात.)

आनंदरावः ते रडणं एक नको बुवा तुझं ! तू रडायला लागलीस की, अक्षरशः किंचाळावंसं वाटायला लागतं !

उषाताई : ( रडतच, चिडून--) किंचाळा की -- किंचाळा ! जमू द्यात लोक पुन्हा ! आणि आता तर तुम्हाला नाहीही म्हणता येणार नाही ! करा एकदा तमाशा घराचा -- ( पुन्हा डोळे पुसतात.)

आनंदरावः मी आता शांत बसतो. नाहीतर काय आहे ... तुझंच चालू दे -- ( स्वस्थ बसून राहतात.उषाताई डोळे पुसतात. जवळ येतात.)

उषाताई : ( मृदू आवाजात ) -- रागावलात ? --

आनंदरावः ( जोरात ओरडतात --) नाही ऽ ऽ ! ( मग एकदम दचकतात, हळू आवाजात --) नाही. नाही -- नाही रागावलो -- ( इकडे तिकडे पाहात राहतात. आपण ओरडलो तो आवाज बाहेर गेला की काय ही भीती --) नाही रागावलो --( घामाघूम. घाम पुसत --) रागावलो नाही --

उषाताई : इतकं काय घाबरताय ? तुमचा आत्ताचा ओरडलेला आवाज अजिबात बाहेर गेला नसेल -- आणि गेला तरी, तो किंचाळीसारखा वाटणं शक्यच नाही --

आनंदरावः ( अजून खालच्या आवाजातच ) आभारी आहे ... आभारी आहे मी तुझा ..

उषाताई : माझे कसले आभार मानताय ? ... हे किंचाळीचं प्रकरण फार लागलेलं दिसतंय मनाला तुमच्या .. असू द्या... हेही दिवस जातील ...

आनंदरावः अलिकडे ताबाच राहीनासा झालाय माझा स्वतःवर. एकदम चिडतो मी. काही सहनच होत नाही. ऑफीसातही खटके उडतात माझे सारखे ... मंडईत गेलो तर, भाजीवाल्यांशी भांडणं होतात ... घरातही नकोसं वाटतं .. काय होतंय मला काही कळत नाही. मघाशी तुम्ही सगळे घरात होता म्हणून बरं झालं. तुम्हीही जर म्हणाला असतात ना, की मीच किंचाळलो म्हणून, तर एखाद वेळेला कबूलही करून टाकलं असतं मी ... त्यामुळं फारसं काही झालं नसतं ... पण विचित्र नजरांनी बघत राहिले असते कायम सगळे माझ्याकडे. ऑफीसातही मग कुणी म्हणालं असतं -- घरी किंचाळताय; तमाशा करताय -- इथं तेच. आणि मग कदाचित वेडा म्हणून नोकरीही गेली असती माझी... माझा मलाच हल्ली काही वेळी विश्वास वाटत नाही.. काय झालंय काही कळत नाही ...

उषाताई : उगीच घाबरता तुम्ही ... अशीच आता इतकी वर्षं गेली की नाही ? आणखीही जातील ... घाबरायचं काय त्यात ...

आनंदरावः हे वाईट आहे तुझं.. मी जरा कमकुवत परिस्थितीत सापडायला लागलो की, डिवचून घेतेस तू मला...

उषाताई : आता काय बोलले बाई मी --

आनंदरावः इतकी सगळी वर्षे माझी अशीच परिस्थिती होती असं म्हणाली नाहीस तू ?

उषाताई : बरं बाई, राहिलं -- इतकं विचार करून बोलता येत असतं, तर नुसतं स्वयंपाकपाणी आणि धुणी-भांडी कशाला करत राहिले असते जन्मभर ?

आनंदरावः मग काय केलं असतंस ?

उषाताई : बघा, म्हणजे पुन्हा बोलायचं चुकलंच ! आणि तुम्ही सारख्या माझ्या चुका काढत गेल्यामुळं बरोबर बोलताच येईनासं झालंय मला --

आनंदरावः म्हणजे आधी येत होतं ? मी बिघडवलं तुला ? अं ?

उषाताई : बघा, म्हणजे हेही चुकलं. काही बोलतच नाही मी आता. घरातसुध्दा असं तोंड दाबून बसावं लागणं म्हणजे कठीण आहे बाई !

आनंदरावः तोंड दाबून बसावं लागतं ? तुला ?

उषाताई : मी आता उत्तर देत नाही. उगीच वाद नको सारखा. झोपू या आता. वी ऽ ऽणे -- ( वीणा - आतून ' आले ' म्हणते. )

उषाताई : ये बाई -- होत नाही मलासुध्दा आता -- पूर्वीसारखे कष्ट झेपत नाहीत आता ...( वीणा येते. ) चल बाई, अंथरुणं घालू लाग तेवढी ...(वीणा पुस्तक ठेवते. दरम्यान बाहेर सामसूम झालेली. काळ्या पोषाखातला, चेहरा झाकलेला एक माणूस चोरपावलांनी दारापाशी आलेला. त्याच्या उजव्या हातात सुरा आहे. काही क्षण उभा राहतो. मग दारावर टकटक करतो. ) कोण आहे बाई आता -- हा सतीशच असणार -- उघड ग दार वीणे-- ( वीणा मुद्रा त्रासिक करते. दार, उघडायला जाते. उषाताईंच्या हातात चादर. आनंदराव स्वस्थ बसलेले. वीणा दार उघडते. त्याबरोबर सुरा असलेला हात वार करण्यासाठी तो माणूस वेगात वर उचलतो. वीणा भयभीत होऊन दोन्ही कानांवर हात ठेवून जोरात किंचाळते. आनंदराव दचकून उभे ... उषाताई दचकून वळलेल्या .. सुरा तसाच वर .. वीणा किंचाळीच्या मुद्रेत... फ्रीझ दृश्य....पडदा पडत जातो...)

<u>अंक पहिला समाप्त</u>

## अंक दुसरा

( पडदा उघडतो तेव्हा, पाहिल्या अंकाच्या शेवटचे फ्रीझ दृश्य -- परंतु आता सुराधारी माणूस नाही. हालचाल सुरू होते तेव्हा, आनंदराव धावत जाऊन दार लावतात. )

आनंदरावः. अगं वीणे, तो पळालेला दिसतोय-- दार लाव -- दार लाव लौकर.( असं म्हणत स्वतःच धावत जाऊन दार लावतात, मग खिडकी लावतात, आणि धापा टाकत उभे राहतात.)... कोण होता कोण जाणे ...पण पळाला.. वीणा किंचाळली म्हणून पळाला... पण किंचाळलीस केवढ्यांदा गधडे...आता पुन्हा गर्दी जमणार ...

वीणा : नाना, केवढी घाबरले मी ... हातात चक्क सुरा होता त्याच्या ... काळा पोषाख आणि फक्त डोळे उघडे... अजून भीती वाटतीय मला. कशासाठी आला होता कोण जाणे ...

उषाताई : अहो, अजून ओरडायला हवं होतं -- पाठलाग करून पकडायला हवं होतं त्याला -- बघा ... दिसला तर अजून ओरडून बघा ... पकडायला हवं होतं त्याला-- ( आनंदराव येणाऱ्या गर्दीचा विचार करत घाबरून उभे ...) अहो, नुसते दार लावून उभे काय राह्यलायत तुम्ही ?

आनंदरावः ते जाऊ दे आता ... पळाला तो ... पोरीचा जीव वाचला हे महत्त्वाचं आहे. पण ती किंचाळली तेवढं एक

वाईट झालंय.

वीणा : अहो नाना, हातात सुरा घेऊन मारायला आलेला माणूस बघून किंचाळायचं नाही तर किंचाळायचं कधी ?

आनंदरावः होय, पण आता पुन्हा गर्दी जमेल त्याचं काय ? आता काय सांगायचं ?

उषाताई : अहो त्यात कसला विचार करताय ! खरच किंचाळलीय वीणा ! आणि इतका भयंकर प्रसंग -- उलट चार लोकांना सांगितलेलाच बरा ! बाई ग ! काय नशीब फिरत चाललंय काही कळत नाही !

आनंदरावः अजून लोकांचा आवाज कसा येत नाहीय ! गडबड तरी काय ही ! सगळे शांत कसे ! धावत पळत आल्याचे -- कसलेच आवाज कसे नाहीत !

उषाताई : अहो येतील एक पाच मिनिटांत ! इतके अधीर कसे होता ! कधी किंचाळी येतेय आणि कधी पळत सुटतोय -- अशी वाट बघत का बसलेत लोक !

आनंदरावः अग पण किंचाळी म्हटलं की, त्या क्षणाला जमली पाहिजे गर्दी !हे असं रमतगमत येऊन काय उपयोग ! मघाशी कसे जमले सगळे -- एका क्षणात ( आवंढा गिळून ) किंचाळी खोटी असून !

वीणा : नाना, मला फार भीती वाटतीय !

आनंदरावः तो माणूस गेला पळून -- ते बघू आता नंतर ! आता पुन्हा गर्दी, इन्स्पेक्टर वगैरे सगळं झालं, तर मात्र वेड लागेल मला ! खरंच !

वीणा : असं काय म्हणताय नाना ? मी शांत उभी राह्यला पाहिजे होते असं म्हणायचंय का तुम्हाला ?

आनंदारावः नाही ग बाई माझे आई ! तसं नाही म्हणायचं मला -- ( पुढे होतात -- खिडकीचं दार किलकिलं करून बाहेर पाहतात -- पुन्हा दार लावून सुस्कारा टाकून --) बहुतेक ऐकू गेलेलं दिसत नाही कुणाला ! हे एक बरं झालेलं दिसतंय -- किंचाळीनं आपलं कामही झालं आणि ऐकूही गेलेलं दिसत नाही कुणाला -- हा सतीश एक ऐन महत्त्वाच्या प्रसंगी घरात नसतो कधी -- सगळं मलाच बघावं लागतंय --

उषाताई : अहो असं काय म्हणताय ? उलट गवगवा व्हायला हवाय या गोष्टीचा -- एक माणूस आपला सरळ भर चाळीत येतो, सुरा उगारतो आणि पळून जातो -- कुणाला थांगपत्ता लागत नाही, किती भयानक परिस्थिती आहे ही !

वीणा : पुन्हासुध्दा येऊ शकेल तो !

उषाताई : नाही तर ! योग्य बंदोबस्ताची व्यवस्था करायला नको ?

आनंदरावः आता गडबड करू नका -- लोकांना सांगायचं असलं तर, कधीही सांगता येईल. आपली घाई नको. सतीश येऊ दे. त्याचाही विचार घेऊ. आम्ही एखादी गोष्ट केली म्हटलं की, नेमकं टेपर ठेवायची संधी घेतो तो. त्याला ठरवू दे काय ते -- म्हणजे तोही जबाबदार राहील. माझी एकट्याची जबाबदारी नको.

उषाताई : अहो असं काय करताय खुळ्यासारखं ? इतका भयानक घडलेला प्रकार एक तासाभरानं किंवा दुसऱ्या दिवशी लोकांना सांगून काय उपयोग ?

आनंदरावः या चाळीतली माणसं एक भारी आहेत साली ! किंचाळी फोडलेली नसताना धापा टाकत धावत आले भांचोद -- आणि आता माणूस खरंच बोंबललं तरी ढुंकून कुणी बघत नाही !

उषाताई : सतीश आज यायचासुध्दा नाही एखादवेळी. म्हणजे तुम्ही काय उद्यापर्यंत थांबून मग सांगणार लोकांना ! असं केल्याबद्दलसुध्दा मूर्खात काढील तो तुम्हाला ! तुम्हाला प्रसंगाचं गांभीर्य काही समजतं की नाही ? ( इथं दारावर टकटक होते. )

आनंदरावः ( घाईनं दाराकडे जात --) सतीशच बहुतेक !

उषाताई : थांबा -- उघडू नका दार एकदम ! सतीशच कशावरून ? ( सगळे ताठर आणि सावध होतात. कानोसा घेत एकमेकांकडे पाहात गप्प उभे राहतात. पुन्हा दार टकटकते. )

आनंदरावः कोण आहे ? ( आवाज इतका घोगरा झालेला की, जवळजवळ आवाज नाही. घसा साफ करून --) कोण आहे ? ( बाहेरून आवाज नाही. सगळे दाराकडे आणि एकमेकांकडे बघत गप्प उभे. )

वीणा : ( जरा जोरात --) कोण आहे ?

सतीश : ( बाहेरून ओरडतो --) मी सतीश आहे ! -- उघड दार ! ( त्याच्या ओरडण्यानं एकदोन घरातले दिवे लागतात. कुणीतरी बाहेर येऊन बघून जाते. पुन्हा शांतता.)

वीणा : आवाज तर सतीशचाच वाटतोय --

सतीश : ( जोरात कडी वाजवून --) अरे, दार उघडा की ! -- ( असं म्हणून तो खिडकीकडे येतो. त्याच वेळी

वीणा खिडकीकडे गेलेली. खिडकीचं दार थोडं उघडून बाहेर पाहते -- त्याच वेळी समोर सतीश --एकदम दचकते -- पटकन दार लावते. मग क्षणात लक्षात आल्यावर पुन्हा उघडते --)

वीणा : सतीशच आहे -- ( जाऊन दार उघडते. सतीश त्रस्तपणे आत येतो.)

सतीश : ( चपला काढत ) काय -- हा काय विचित्रपणा चालवलाय तुम्ही ! दार का नाही उघडतं ?

आनंदरावः अरे बाबा, फटाफट चिडत जाणं सोपं आहे-- आम्ही असं का वागलो हे समजून घेतलंस तर,डोक्यावरचे केस उभे राहतील तुझे ! इतके भयानक प्रकार घडताहेत घरात, पण तुला फिकीर आहे का कसली ?

सतीश : ( चिडून ) काय झालं ?

वीणा : आत्ता, थोड्या वेळापूर्वी अशीच टकटक झाली दारावर -- आत्ता तू केलीस तशीच ! नेहमीप्रमाणे नानांनी मला दार उघडायला लावलं ! आणि मी दार उघडलं, तर समोर काळ्या पोषाखातला एक माणूस चक्क सुरा उगारून उभा ! अशी घाबरून ओरडले मी ! बापरे !

सतीश : म्हणजे पुन्हा माणसं जमवलीत तुम्ही ! च्यायला, हे घर म्हणजे --

आनंदरावः नाही रे बाबा ! बहुतेक ऐकू गेलं नाही कुणाला -- तो माणूस घाबरून पळून गेला -- पण अजून काही लोक जमलेले नाहीत --

सतीश : म्हणजे आरडाओरडा करून त्याला पकडायचा काहीच प्रयत्न केला नाहीत तुम्ही ?

आनंदरावः पकडतोस कसला गाढवा ? हातात सुरा होता त्याच्या . पटकन दारखिडकी लावून घेतली आणि जीव वाचवला आधी !

सतीश : ( थक्क होऊन) अहो, पण तो माणूस निसटून गेला की नाही ! असं काय वागता तुम्ही हल्ली ? पकडायला नको होतं का त्याला ?

आनंदरावः हे बघ, मी आहे मूर्ख ! काय ! तू थांबत जा मग घरात अशा प्रसंगी !

सतीश : असली माणसं काय कळवून येतात वाटतं ! तुमच्यात काहीतरी बिघाड झालाय नाना हल्ली !

आनंदरावः झालाय ना बिघाड ? असू दे. आता मुख्य मुद्दा असा आहे की, हे घडलेलं सगळं लोकांना सांगायचं की नाही -- कारण सुदैवानं वीणेची किंचाळी काही कुणाला ऐकू गेलेली दिसत नाही -- म्हणजे आपण ठरवू शकतोय यात -- काय करायचं ते --

सतीश : तुम्ही विचार कसला करताय नाना ! अहो, ताबडतोब सांगायला पाहिजे हे लोकांना -- कमालाय बुवा -- मी आणतो बोलावून सगळ्यांना -- ( निघतो.)

आनंदरावः थांब. अगदी सगळ्यांना -- म्हणजे सगळ्यांना बोलवू नकोस. निवडक काही माणसांना बोलव -- विचारविनिमयाला.

सतीश : ते आता बघतो मी -- ( जातो. )

आनंदराव : अरे, निदान त्या वाटव्याला तरी बोलवू नकोस -- ( हे वाक्य संपायच्या आतच सतीश गेलेला ) -- आता वीणेनं किंचाळी फोडली होती याच्यावर एकदा विश्वास बसला सगळ्यांचा तर बरं आहे !

उषाताई : यात विश्वासाचा काय प्रश्न येतोय; आपण स्वतःच कबूल करतोय म्हटल्यावर ?

आनंदरावः. ( चिडचिडून-- ) अहो, तुम्ही लाख कबूल केलंत तरी, फुटलेली किंचाळी न ऐकणं हा त्यांचा माणुसकी - हीनपणा नाही का ठरवणार ! विश्वास ठेवून कसं चालेल त्यांना !

वीणा : अहो पण नाना, खरंच एखादे वेळेस ऐकू नसेल गेलं कुणाला -- मुद्दाम कशाला कोण गप्प बसतंय ?

आनंदरावः शहाणी आहेस ! माणूस सहज बोलत असला तर, एखादं वाक्य ' नाही ऐकू आलं बुवा ' म्हटलं तर एक ठीक आहे. पण माणूस किंचाळल्यावर ' नाही ऐकू आलं बुवा ' असं म्हणता येईल का ? -- मला तर असं वाटायला लागलंय की, सतीशनं घाईच केली जरा -- जरा विचार करू या म्हणतोय तर, गेलासुध्दा -- भंपकपणाच चाललाय सगळा --

उषाताई : काही नाही -- तो बोलावतोय सगळ्यांना तेच बरोबर आहे. असं काही बाही घडायला लागल्यावर सगळ्यांनाच धोका आहे हा -- ( दरम्यान बाहेर सतीश काही लोकांना उठवतो -- कुणाशी काही बोलतो वगैरे --)

आनंदरावः म्हणजे वीणा किंचाळली हे --( अचानक वाटवे प्रवेश करतात.)

वाटवे : काय म्हणालात, वीणा किंचाळली ?

आनंदरावः या !!! सगळे सोडून नेमके तुम्हीच या पहिले !

वाटवे : काही चुकलं का ? तुम्हाला खटकत असेल तर जातो बापडा ! पण असा माणूसघाणेपणा स्वभावात

नाही हो आमच्या !

आनंदरावः नाही, नाही. थांबा की ! खटकतबिटकत काही नाही ! उलट तुम्ही नसलात या प्रसंगी, तरच खटकल्यासारखं होईल ! काहीही रंगीत आणि रसभरित घडणार असलं की, तुम्ही पाहिजेतच तिथे !

वाटवे : मग हरकत नाही. झोप येत नव्हती म्हणून गॅलरीत फिरत होतो हो. तर सतीश घाईघाईनं लोकांना बोलावताना दिसला -- म्हटलं काय झालं -- म्हणून सहज आपला आलो तर तुम्ही म्हणत होता ' वीणा किंचाळली -- ( एवढ्या वेळात लोक जमलेले. मोरेकाका, गाडगीळ, सौ.गाडगीळ, इतर काही लोक, मागून सतीश, एकदोन पोरे वगैरे. )

मोरेकाकाः काय म्हणालात ? वीणा किंचाळली ?

आनंदरावः थांबा मोरेकाका. सगळं सांगतो, बसा. हं. शेवटी सांगायचं ठरवलं आम्ही !

सतीश : आता हे कशाला पाहिजे नाना--

वाटवे : म्हणजे मघाशीची ती किंचाळी वीणाची होती काय ?

आनंदरावः होय, म्हणजे ऐकली होती तुम्ही ती ?

वाटवे : वा ! काय विचारताय आनंदराव ? इतकी माणसं जमली होती. तुम्ही नाही नाही म्हणत होता -- आणि आता उलटं आम्हालाच विचारताय -- ऐकली होती का म्हणून ! कमालाय !

सतीश : ती किंचाळी नव्हे हो वाटवेकाका ! काहीतरीच बोलताय तुम्ही ! मोरेकाका, तुम्ही नीट ऐकून घ्या बरं !

मोरेकाकाः ऐकतोय की आता । सांगा की ! (विजय आणि मंदारही येऊन उभे. )

वाटवे : म्हणजे ती किंचाळी कुणाचीच नव्हती हे पुन्हा सांगण्यासाठी पुन्हा बोलावलंत काय आम्हाला ! काय उगीच पायपीट करायला लावताय ! काय चाललंय काय हे !

मोरेकाकाः तुम्ही जरा थांबा हो वाटवे ! ( आनंदरावांना --) हं - बोला.

आनंदरावः मी आता हे जे सांगतोय ते पहिल्या किंचाळीबद्दलचं नव्हे. पहिला तो किंचाळीचा प्रकार होऊन गेला की नाही -- त्यानंतर काही वेळानं हा -- हा मी सांगतोय हा प्रकार घडला.

वाटवे : म्हणजे पुन्हा कोण किंचाळलं बिंचाळलं म्हणताय काय ?

आनंदरावः होय, ही वीणा किंचाळली.

वाटवे : हां ! तरीच म्हटलं ! कारण पहिली किंचाळी सरळ सरळ पुरुषाच्या आवाजातली होती --

आनंदरावः ( चिडून ओरडतात ) मी पहिल्या किंचाळीचं बोलत नाहीयाय ! दुसऱ्या-- दुसऱ्या किंचाळीचं बोलतोय मी ! सारखं पहिल्या किंचाळीचं काय लावलंय !

मोरेकाकाः बरं, नाही. आनंदराव -- सांगा -- दुसऱ्या किंचाळीचं सांगा -- आणि वाटवे, तुम्ही जरा मधे बोलू नका -- हं -- बोला आनंदराव --

आनंदरावः तुम्ही पहिल्या किंचाळीचा विषय आधी डोक्यातून काढलाय का ? तरच मला पुढं बोलता येईल. पहिली किंचाळी आमची नव्हती.

वाटवे : बरं. ठीक आहे. तुमची नव्हती, धरून चालू क्षणभर -- पुढं बोला. ( आनंदराव संतापून त्यांच्याकडे पाहतात.)

मोरेकाकाः वाटवे, तुम्ही नका हो बोलू मधेमधे -- हं -- बोला आनंदराव --

आनंदरावः ठीक आहे -- ( विजयकडे लक्ष जाते ) विजय आहेच वाटतं ! त्याला जरा कुणीतरी धरून ठेवा. लगेच इन्स्पेक्टर वगैरे भानगडी नकोयत --

मोरेकाकाः विजय -- आम्ही तुला सांगितल्याशिवाय इन्स्पेक्टरला बोलवायचं नाही -- अं ? हं -- बोला --

आनंदरावः हं -- तर झालं काय -- मघाशी दारावर टकटक झाली --

वाटवे : बास ? एवढंच ? ( आनंदराव आणि मोरेकाका त्रस्तपणे पाहतात -- मग-- )

आनंदरावः तर मघाशी दारावर टकटक झाली. नेहमी बहुतेक मीच दार उघडतो -- पण मघाशी योगायोगानं या वीणेनं दार उघडलं --

वाटवे : दार कुणी उघडलं याच्यातच काय वेळ खाताय ? बाहेर कोण होतं ते सांगा --

आनंदरावः बाहेर हातात सुरा घेतलेला, काळ्या पोषाखातला एक माणूस होता !( वाटवे उठून उभे. ) ही इकडे उभी - मी हा या इथं उभा -- आणि दारात हा माणूस ! दार उघडल्यावर एकदम सुरा उगारलान त्यानं --

मोरेकाकाः काय म्हणताय !

आनंदरावः ते पाहिलंन मात्र वीणानं ! अशी किंचाळली म्हणताय ! काही विचारू नका.

मोरेकाकाः बरं !--

आनंदरावः ती किंचाळली, की तो माणूस लगेच वळला आणि पळून गेला -- आम्ही पटापट दार आणि खिडकी लावून घेतली आधी -- पोरीचा जीव वाचला आज !

वाटवे : कधीची गोष्ट ही ! आम्हाला कसं काही कळलं नाही !

आनंदरावः बहुतेक, वीणा आम्हाला वाटतंय तितक्या जोरात किंचाळली नसावी -- कारण तुम्हाला कुणालाच कसं काही ऐकू गेलं नाही याचं आश्चर्यच वाटतंय आम्हाला मघापासून --

मंदार : आम्हाला ऐकू आलं असतं तर तो माणूस असा सुटला नसता -- वीणा बहुतेक हळू आवाजात किंचाळली असणार --

वाटवे : तेच म्हणतो मी. ऐकू आलं तर माणसं येतातच हो धावत -- मघाशी नाही आली ?

आनंदरावः वाटवे, तुम्हाला या दुसऱ्या प्रकारातला काही भयानकपणा कळतोय का ? की ते पहिलंच उगाळत बसायचंय तुम्हाला ?

विजय : मला वाटतं ही तक्रार नोंदवायला हवी आपण. आणू बोलावून ?

आनंदरावः नको, नको. त्याला धरून ठेवा आधी कुणीतरी.

वाटवे : का ? तुम्ही सांगितलेलं खरं आहे ना सगळं ? मग तक्रार द्यायला काय हरकत आहे ? तक्रारीला घाबरताय का असे ?

आनंदरावः घाबरायचं काय त्यात वाटवे ! आपण विचार करून ठरवूया काय ते ! घाई नको.

मोरेकाकाः ( सावकाशपणे ) वीणा किंचाळली म्हणता ?

आनंदरावः विचारा की तिला --

वीणा : इतकी घाबरले होते मी --

उषाताई : आता काय होतंय आणि काय नाही असं झालं अगदी !

वाटवे : माझं स्पष्ट मत सांगू का ? ( सगळे पाहतात ) हे चाललंय हे काही चांगलं नाही. प्रत्यक्ष किंचाळी फोडायची आणि लोक जमले की ' आम्ही नाही ' म्हणायचं -- आणि किंचाळी फुटलीच नाही म्हणून लोक आपापल्या घरात स्वस्थ असले की, त्यांना बोलावून आणून खोटी किंचाळी फोडल्याचं सांगायचं -- हे नुसते लोकांना त्रास देण्याचे प्रकार आहेत.

आनंदरावः अहो, असं कसं म्हणता वाटवे ? लोकांना त्रास देऊन काय फायदा होणार आहे आमचा ?

वाटवे : करमणूक ! करमणूक होत असेल तुमची !

आनंदरावः अहो पण --

वाटवे : माणूस किंचाळलं तरी ऐकू न येण्याइतकी चाळ बहिरी झालेली नाही अजून !

आनंदरावः अहो, पण ती हळू किंचाळली असेल म्हटलं ना !

वाटवे : तुम्ही किती गडबडून गेलायत, तुमचं तुम्हीच बघा. माझा या प्रकारांना सक्त विरोध आहे. आता या घरातून लागोपाठ शंभर किंचाळ्या आल्या तरी, आपण फिरकणारसुध्दा नाही इकडे ! मला हे अजिबात पटलेलं नाही. मी चाललो. ( तडकाफडकी निघूनच जातात.)

आनंदरावः ( या धक्क्यातून सावरत जरा वेळानं--) वाटव्यांचं म्हणजे हे असंच ! माथेफिरूसारखं वागतात अगदी --

मोरेकाकाः नाही, हे बघा आनंदराव, मी काय म्हणतो की, तुम्ही म्हणता असं खरंच घडलं असेल तर, बाब गंभीर आहे -- सबंध चाळीलाच धक्का देणारी गोष्ट आहे ही -- उगीचच आपलं किरकोळ धरून चालण्यासारखी गोष्ट नाही ही -- खरंच घडलंय का हे सगळं ?

आनंदरावः. म्हणजे मोरेकाका, तुम्हीही अविश्वास दाखवताय माझ्यावर !

मोरेकाकाः नाही, अविश्वास नाही, पण तुमच्या सांगण्यातल्या बऱ्याच बाबतीतल्या शक्यता पटण्यासारख्या नाहीत. तुम्ही खरंच बघितला का तो माणूस ? की भासबीस झाला तुम्हाला ?

आनंदरावः अहो, आम्हाला तिघांनाही एकदम कसा भास होईल मोरेकाका ? तुम्ही आमच्यावर अविश्वास दाखवला तर, ती एक फार दुर्दैवी आणि धोक्याची गोष्ट ठरेल, एवढंच मी सांगतो.

गाडगीळ : म्हणजे जिने चढून तो माणूस वर आला -- ही किंचाळली -- तो जिने उतरून खाली पळाला -- आणि चाळीत कुणालाच कळलं नाही -- एवढं सगळं म्हणायचंय काय तुम्हाला ?--

आनंदरावः होय गाडगीळ, असंच झालं सगळं.

मोरेकाकाः ( उठत ) विचार केला पाहिजे.. चला ! आणि विजय, तक्रारबिक्रार काही नाही - घरी जाऊन झोप

स्वस्थ -- अं ? -- बरंय आनंदराव.

आनंदरावः म्हणजे --

मोरेकाका उद्या बोलू आपण सविस्तर -- अं -- चला -- चला रे -- काय पोरासोरांची गर्दी लगेच -- पिंट्याही जागा वाटतं अजून ? चला रे -- चला -- ( जातात. इतरही बरेच लोक जातात. मंदार आनंदरावांच्या जवळ येतो. त्यांच्या पाठीवर हात ठेवतो. स्मित करतो आणि जातो.. गाडगीळ आणि सौ. गाडगीळी गेलेले. एकट्या सौ. गाडगीळ परत येतात. आता गर्दीपैकी कुणीही नाही. )

सौ.गाडगीळः उषाताई, इकडे या हो जरा.( उषाताई दाराजवळ जातात.) विचारीन विचारीन म्हणत होते --

उषाताई : काय ते ?

सौ.गाडगीळः हे सगळं खरं होतं का हो ?

उषाताई : अहो, खरंच -- पण आता --

सौ. गाडगीळः म्हणजे खरंच सुरा घेतलेला माणूस आला होता ?

उषाताई : अहो होय ! खरंच ! काय घाबरलो आम्ही !

सौ.गाडगीळः तुमच्याकडे बरं बाई घडत असतं एकेक ! मजाय न् काय ! बरं येते हं मी -- उशीर झाला तर हे रागावतील लगेच -- ( जातात.)

आनंदरावः. ( सतीशला ) तू का बाबा असा स्वस्थ उभा ? कसला विचार करतोयस ?

सतीश : विचार नव्हे -- मी तरी कसा असा पटकन विश्वास टाकला तुमच्यावर याचं आश्चर्य वाटतंय । हातोहात फसवलंत तुम्ही मला ! अगदी खुळा करून टाकलंत चाळीत ! ( आनंदराव पाहतात. तीनचारदा कपाळ बडवून घेत बसतात.मग डोकं झटकतात.) हे सगळं जवळजवळ अशक्य वाटण्यासारखंच आहे. बहुतेक भासच झाला असेल तुम्हाला. फार तमाशा केला तुम्ही आज.

उषाताई : ( जाऊन दार लावून घेत-- ) अंथरुणं घाला आणि झोपा आता -- खूप झालं -- आजचा दिवस अगदी कायम लक्षात राहण्यासारखा गेला. ( दारावर हळुवार टकटक होते.) आता कोण आणखीन ? आजचा दिवस संपणार आहे की नाही ? ( सतीश दाराकडे जाऊ लागतो --) सतीश, थांब जरा. कोण आहे ते विचारून घे आधी -- आता पुन्हा किंचाळण्याचा प्रसंग आला, तर कुत्रंसुध्दा फिरकायचं नाही इकडं -- ( सतीश मान झटकतो आणि जाऊन दाराची कडी काढतो. वीणा आणि उषाताई पाहताहेत. आनंदराव उठून उभे राहिलेले. सतीश दार उघडतो. दारात सुहास्यवदन मंदार. मंदार आत येऊन दार लावतो.)

मंदार : मला कल्पना आहे की, तुम्ही कसल्या त्रासदायक प्रसंगातून जात आहात -- पण काळजी करू नका -- सत्य शोधून काढीनच मी -- आपल्या चाळीतले लोक एकजात मूर्ख आहेत -- कुणाचाच विश्वास बसला नाही तुमच्यावर -- पण माझा बसलाय - अहो, बोलतानाचे तुमचे चेहरेच सांगत होते की, तुम्ही खरं बोलताय -

आनंदरावः आभारी आहे मी तुझा -- तू तरी एक खरं ओळखणारा निघालास !--बाकीचं आपण आता उद्या बोलू --

मंदार : नाही, तुमच्याशी काही प्रश्नोत्तरं होणं आवश्यक आहे, ती उद्या घेऊ -- पण वीणाला आत्ता रात्रीच घ्यून टाकावं म्हणतोय -- हिला दिवसा घ्यायचं म्हणजे भलतीसलती चर्चा होईल लगेच चाळीत -- म्हणून म्हणतोय -- फक्त दहा पंधरा मिनिटांत उरकतो मी --

वीणा : आता नको बाबा -- थकलेय मी अगदी --

मंदार : वीणा, तुझ्या सहकार्यावर बऱ्याच गोष्टी अवलंबून आहेत हे लक्षात घे-- आणि माझ्या कामाची चर्चा व्हायला नकोय मला -- तू फक्त मी प्रश्न विचारीन तसं सत्य उघड करत जा -- त्या सत्याचा कसा उपयोग करायचा ते मी बरोबर करतो सगळं -- जरा त्रास होईल तुला -- पण पुढं समाधान वाटेल -- खात्री आहे माझी --

वीणा : बरं -- विचार --

मंदार : मला वाटतं, तुमची कुणाची हरकत असू नये - तुमच्या मनावरचं ओझं कमी करायच्या मार्गात आहे मी -- हं -- तर वीणा, प्रसंगाचं दडपण मनावरून काढून टाक आणि धीरानं उत्तरं दे -- मी जे प्रश्न विचारणार आहे, ते सगळे पहिल्या प्रकाराबद्दल आहेत -- काही प्रश्न कदाचित चीड येण्यासारखे वाटतील, पण शांत राहा - हे सगळं महत्त्वाचं आहे -- हं - तर माझा पहिला प्रश्न असा आहे की, तुझे नाना खरंच किंचाळले होते की नाही ? -- नीट आठवून उत्तर दे. प्रश्न महत्त्वाचा आहे.

वीणा : नाही.

मंदार : प्रत्यक्ष ते किंचाळले नाहीत त्या वेळी तू तिथं हजर होतीस काय ?

वीणा : होय.

मंदार : काय करत होतीस ?

वीणा : वाचत होते.

मंदार : मग वाचत असताना -- तू वाचण्यात गढलेली असताना -- ते किंचाळले नाहीत हे तुला कसं कळलं ?

वीणा : ते जर किंचाळले असते तर वाचन थांबवून मी बघितलं असतं. पण मी तसं काही केलं नाही; त्या अर्थी ते किंचाळले नाहीत.

मंदार : ठीक.आता मला असं सांग, तुझे नाना आज किंचाळले नाहीत, त्याच्या पूर्वी कधी किंचाळले होते काय ?

वीणा : नाही.

मंदार : हे उत्तर तू सगळं आठवून देते आहेस की, अंदाजानं देते आहेस ?

वीणा : ते पूर्वी कधीही किंचाळले नव्हते ही माझी माहिती बरोबर आहे. म्हणजे ... अर्थात त्यांच्या लहानपणाची मला माहिती नाही.

मंदार : लहानपणी त्यांना एवढ्या तेवढ्याला किंचाळायची सवय होती -- असं मला कळलं आहे --( आनंदराव संतापून उठू लागतात -- त्यांना खुणेनं शांत करत --) ते खरं आहे का ?

वीणा : ( आनंदरावांना ) काय हो नाना ?

मंदार : त्यांच्याकडून उत्तर नकोय मला -- तुझं उत्तर हवंय.

वीणा : मग या प्रश्नाचं उत्तर मला देता येणार नाही.

मंदार : ठीक आहे. तू म्हणतेस की, तुझे नाना किंचाळले नाहीत -- अं ?

वीणा : होय.

मंदार : तर तुझे नाना जेव्हा किंचाळले नाहीत, तेव्हा दुसऱ्या एका ठिकाणाहून एक किंचाळी फुटली होती.

वीणा : असं म्हणतात.

मंदार : ती कुठून फुटली होती ?

वीणा : माहीत नाही.

मंदार : नुसतं ' माहीत नाही," माहीत नाही' असं म्हणत राहू नकोस. आता मला असं सांग की, ती किंचाळी -- म्हणजे तुझ्या नानांनी न फोडलेली -- तू किंवा तुमच्या घरातील कुठल्याही व्यक्तीनं ऐकली काय ?

वीणा : नाही.

मंदार : हां. मग ती किंचाळी जर तुम्ही कुणी ऐकलीच नाही तर ती फुटली होती हे तू कशावरनं सांगतेस ?--

वीणा : लोकांचं त्यावेळचं जे बोलणं -- वागणं मी बघितलं -- त्यावरून.

मंदार : मग लोक असं म्हणतात की, किंचाळी तुझ्या नानांनीच फोडली होती -- त्यावर तू का विश्वास ठेवत नाहीस ?

वीणा : कारण ते किंचाळी फोडत नसताना मी प्रत्यक्ष तिथे होते.

मंदार : ठीक आहे. थँक यू ! बरीच महत्त्वाची माहिती मिळाली मला - आज एवढं पुरे --( जाता जाता सतीशजवळ येऊन ) घाबरायचं काही कारण नाही-- ( पाठीवर थोपटत --) बी चिअरफुल !( स्मितहास्य) कामात प्रगती आहे आपल्या- ( पुन्हा पाठीवर थोपटून- ) अच्छा, गुडनाईट ! गुडनाईट नाना ! ( दार उघडून जातो. दार लावून घेतो. सतीश तरातरा जाऊन दाराला कडी घालतो.)

सतीश : हे सगळं काही संपेलसं वाटत नाही मला. खड्डयात जाऊ दे सगळं. मी झोपतो. ( तावातावाने गादी टाकतो. शर्ट काढून अडकवतो आणि गादीवर पडतो. )

वीणा : ( थकलेली -- जांभई देत --) मी पण झोपते बाई आता --( तीही पडते.)

आनंदरावः ( बसूनच-- ) आणि वीणे, भिऊबिऊ नकोस आता झोपेत - अजिबात स्वप्नबिप्न काही पडता कामा नये --ओरडली बिरडलीस झोपेत, म्हणजे पुन्हा रात्रभर सुरू होईल धुमाकूळ -( कुणी काही बोलत नाही. उषाताई येऊन आनंदरावांसमोर बसतात.)

उषाताई : सरळ चाललं होतं मेलं घर हे -- तर हे मधेच काही तरी निघालं --

आनंदरावः गंमत बघ -- वीणेची किंचाळी खरी असून कुणी मनावर घेतलं नाही विशेष, पण मी ओरडल्याचं काही सोडायला तयार नाहीत -- आमचं नशीबच असलं. त्रास नुसता सगळा --

उषाताई : जाऊ द्या की आता ते --

आनंदरावः त्या मंदारनं तर पिच्छाच धरलाय - मला दुसरी काही भीती नाही --उलटच्या दिशेला जाऊन, मीच किंचाळलो म्हणून सिध्द करतोय का काय तो, एवढीच भीती आहे. काय काय बेअब्रू व्हायचीय आयुष्यात काही कळत नाही.

उषाताई : अहो, असं कसं सिध्द करता येईल त्याला ?

आनंदरावः ते काही सांगू नकोस. खोटंसुध्दा खरं म्हणून सिध्द व्हायची शक्यता असते. आणि हीच जास्त शक्यता असते.

उषाताई : आता चाळीतले लोक भंडावून सोडणार थोडे दिवस. विशेषतः बायका तर छळतील मला. आपल्याच घराकडनं कशी आली मेली ती किंचाळी कोण जाणे ... नशीब फिरत चाललंय एवढाच याचा अर्थ ...

आनंदरावः थोडे दिसत गेले की, विसरूनही जातील म्हणा लोक .. इतक्या महत्त्वाच्या मोठमोठ्या गोष्टी घडतायत त्या लक्षात ठेवायला वेळ नाहीय लोकांना. हे किंचाळीचं फालतू कोण लक्षात ठेवत बसतंय ... पण यापुढं काहीही करून शांतता टिकवली पाहिजे घरात -- अजिबात आवाज म्हणून कसला बाहेर जाऊ द्यायचा नाही. हे एक मात्र दडपण राहणारच...

उषाताई : ते झालं हो -- तुमच्या किंचाळीचंच काय एवढं घेऊन बसलाय -- तो माणूस सुरा घेऊन आला होता हे सगळ्यात भयंकर घडलंय -- काय हेतू असेल त्याचा कोण जाणे -- आपल्या घरातल्या कुणाला त्याला माराबिरायचं होतं, का चोरी करायची होती, कोण जाणे. आणि लोकांना सांगूनसुध्दा खरं वाटत नाहीय -- हे फारच भयंकर घडतंय --

आनंदरावः ते विचार करून काही कळणार नाही ... आता शांतता टिकवणं आणि आल्या गेल्यावर नीट लक्ष ठेवणं हे अगदी कटाक्षानं करावं लागणार आहे ...

उषाताई : जाऊ द्या आता ते -- इतकं मनाला लावून घेऊ नका. सगळं पुन्हा पहिल्यासारखं सुरळीत होईल.

आनंदरावः ती किंचाळी आपली नसूनही आपल्या मानगुटीवर बसलीय याचंच वाईट वाटतंय --

उषाताई : कुणाची का असेना, आलीय ना आपल्या वाट्याला ? .. पदरी पडलं आणि पवित्र झालं म्हणायचं. दुसरं काय करणार ...

आनंदरावः ठीक आहे... हा विचार काढूनच टाकावा आता मनातनं... काय अगदीच त्या मंदारनं सिध्दच करायचा प्रसंग आणला तर, कबूल करून टाकू... मीच किंचाळलो होतो म्हणून ... काय होणार आहे ...

उषाताई : छे ! इतकं काही अगदी खचून जायला नको -- का म्हणून कबूल करायचं आपण ? अहो, खरोखर किंचाळलेले लोकसुध्दा कबूल करत नाहीत ..आपण काय म्हणून कबूल करायचं...मुळीच करायचं नाही...

आनंदरावः अशा महत्त्वाच्या प्रसंगी तुझं डोकं चांगलं चालतं हे एक नशीबच म्हणायचं.

उषाताई : प्रसंग गेला की, हे सगळं चांगलं विसरून जायची सवय आहे पण तुम्हाला ... तसं तुम्ही जर प्रेमानं वागलात नं, तर खूप बरी आहे मी ... सारखी चिडचिड केली की, डोकं ठिकाणावर राहात नाही माझं. दुसरी एखादी असती तर, कधीच पळून गेली असती... मी म्हणून टिकलेय ...

आनंदरावः चांगलं म्हटलेलं पेलत नाही तुला.. लगेच वाहवत जातेस तू ...

उषाताई : बरं बाई.. मी काही बोलतच नाही आता. झालं ? चला, झोपावं आता... खूप उशीर झालाय ... ( कसंबसं उठून अंथारुणाकडे जात --) आता उद्याच्या दिवसात आणखी काय वाढून ठेवलंय कोण जाणे .. रामा रामा ऽ पांडुरंगा ऽऽ ( जांभई ) झोपा आता. काही विचार नका करू --काय व्हायचं ते टळत नाही -- ( पडतात.)--

आनंदरावः हं. मला झोप आली की झोपतो मी. तू झोप --

उषाताई : दिवा तेवढा काढायचा राहिला बघा.. काढता का ? .. उठवत नाही आता...

आनंदरावः हं...( उठतात. जाऊन दिवा घालवून येऊन, पुन्हा बसतात. नुसते स्वस्थ, कसल्यातरी विचारात बसून राहतात. त्यांच्यावर अर्थात अंधुक स्पॉट. असे काही क्षण. मधेच एकदा उषाताई ' आई ग --' म्हणतात. मग काही क्षण नुसती शांतता. आनंदराव एकटे बसून .. मग अचानक अतिक्षीण आवाजात --' आ, आ, आ ऽऽऽ' अशी किंचाळी ऐकू येते. आनंदराव एकदम चार्ज झाल्यासारखे उठतात. तशीच किंचाळी पुन्हा. आनंदरावांच्या डोळ्यांत वेगळीच चमक. भरभर जाऊन दिवा लावतात. वीणा, सतीश आणि उषाताई उठलेले.)

आनंदरावः वाटव्याचा आवाज ! वाटव्याचा आवाज !! उठा,उठा - वाटव्या किंचाळतोय ! चला !आजच हे घडलं ते

बरं झालं ...( अत्यंत घाईत ...) चला, चला, बघू या आता ...( सतीश, वीणा, उषाताई उठून उभे ...बाहेर लोकांची गडबड.. आनंदराव दार उघडतात... ते जितक्या उत्सुकतेने बाहेर जात आहेत, तितक्याच उत्सुकतेने आलेले वाटवे आणि गाडगीळ दारात ... त्या दोघांच्या उत्सुकतेत जरा त्रासिकपणा... सगळी पळापळ शेवटी आनंदरावांच्या दिशेनेच येते आहे ... वाटवे-- गाडगीळ आणि आनंदराव समोरासमोर ... डाव्या हाताला मागे वीणा, उषाताई आणि सतीश ... बाहेर गर्दी..फ्रीज दृश्य... हालचाल सुरू होताच आनंदराव पूर्ण खचलेले आणि वाटवे-गाडगीळ चिडलेले. गर्दीतले काहीजण आता सरळसरळ हसत येतात. किंचाळीचे गांभीर्य गेलेले. नवीन काय प्रकार -- एवढीच उत्सुकता. मोरेकाका मात्र एक गंभीर, जबाबदार माणसाचे समजुतदार बेअरिंग राखून. हा समजुतदारपणा या गर्दीत उठून दिसण्याइतका वेगळा.)

आनंदरावः आता ही पण माझीच ?

वाटवे : आमच्यातल्या माणुसकीची थट्टा चालवलीय तुम्ही. आता कशासाठी किंचाळलात ते सांगा आम्हाला. रात्र किती झालीय, वाजलेत किती, काही बघता की नाही ? ही काय गंमती करत बसायची वेळ आहे ?

मोरेकाकाः ( आत येत --) आनंदराव, काय चाललंय हे ? आता ही तुमची किंचाळी तर आम्ही सगळ्यांनीच नीट ऐकलीय --

आनंदरावः ( त्यातल्या त्यात आवाज वाढवत -- ) अहो, पण ही किंचाळी वाटव्यांची होती --( गर्दीतले लोक हसतात. ) -- वाटव्यांचा आवाज वाटला म्हणून तर आम्ही सगळे उठून बाहेर येत होतो --

वाटवे : माझ्या भुताची असेल ती किंचाळी !

मोरेकाकाः अहो आनंदराव, वाटवे आणि मी तर आमच्या घरात बोलत बसलो होतो.

सतीश : डोकी फिरलीयत तुमची सगळ्यांची. नाना आत्ता काही किंचाळले बिंचाळले नव्हते. स्वस्थ बसलेले होते.

वाटवे : तू कशाला एवढं सांभाळून घेतोयस बापाला ? इथं चाळीत शंभर लोकांची झोप उडवलीय त्यांनी ! शहाणा असशील तर हे सगळं थांबवायची अक्कल शिकव जरा त्यांना !

मोरेकाकाः किंचाळी वाटव्यांची होती असं खोटं का बोलताय तुम्ही आनंदराव ? सगळी आपलीच माणसं आहेत. खरंखरं सांगून टाका बरं सगळं.

आनंदरावः अहो पण आवाज वाटव्यांचा होता आणि किंचाळी त्यांच्याच घराकडून आली होती . आम्ही सगळ्यांनी ऐकलीय ती - विचारा की -

उषाताईः हे म्हणतायत ते अगदी खरं आहे. त्या किंचाळीनं तर दचकून उठलो आम्ही --

वीणा : नाना तर इतके थकून बसले होते --

सतीश : हे बघा -- फालतू चर्चा आणि आरोप करायचं काही कारण नाही -- नाना किंचाळले नाहीत हे नक्की ! आता बाहेर व्हा सगळे -- आणि आमचं पटत नसेल तर काय करायचं ते करा -- जा !
( वातावरण स्फोटक. )

वाटवे : ( ओरडत-- ) नाही जात बाहेर ! काय तमाशा लावलाय हा ! वा रे वा ! लोकांच्या झोपेचं खोबरं केलंत तुम्ही ! काय चालवलंय हे ! ( कोलाहल वाढत जातो. सगळेच एकदम बोलायला लागतात.आनंदराव, वाटवे, गाडगीळ, सतीश, गर्दीतले इतर लोक वगैरे. मोरेकाकांचा सामंजस्याचा अयशस्वी प्रयत्न. हा कोलाहल चालू असतानाच अचानक एका क्षणी बटण ऑफ केल्यासारखा सगळा आवाज बंद होतो. मंडळी आपसात मोठमोठ्यांदा काही बोलत आहेत. आनंदराव चकित आणि भयग्रस्त.एकदम सुन्नच होऊन उभे...समोर नुसतेच सनसनाटी दृश्य आणि आवाज शून्य. आनंदराव उषाताईंना एका बाजूला बोलावतात. आणि ' तुला सगळं ऐकू येतंय का ? ' म्हणून विचारतात -- त्याचाही आवाज नाही. उषाताई चकित -- भयभीत होत ' हो - येतंय ऐकू ' म्हणतात - त्याचाही आवाज नाही. आनंदराव दिङ्मूढ उभे. असे काही क्षण गेल्यावर अचानक पुन्हा सगळे आवाज सुरू --)

गाडगीळः ( मोरेकाकांचं हे नेहमीचं) आहे ! ( म्हणजे ' आहे' पासून आवाज सुरू -- ) अगदी भयानक काही घडत असलं तरी शांत राह्यचा सल्ला देत राह्यचं म्हणजे काय !

मोरेकाकाः अहो, मग आता काय करावं म्हणता?

आनंदरावः ( हायसं वाटून -- ) हं ! आता ऐकू येतंय मला सगळं. बोला आता ! ( हे ऐकून उषाताईही सुस्कारा टाकतात.)

वाटवे : बोलत नाही आता -- बोंबलतो ! च्यायला, बघा ! इतकी बोंबाबोंब चाललीय इथं -- आणि आता ऐकू

यायला लागलं म्हणे यांना !

आनंदरावः हे बघा मंडळी, बरं का. एक मिनिट, अहो, जरा लक्ष द्या इकडं --

मोरेकाकाः एक मिनिट ! शांत व्हा जरा, शांत व्हा !

एकजण : ( दुसऱ्यांशी बोलता बोलता --) शांत काय व्हा ! शांत व्हा म्हणे ! ( हळूहळू शांतता. )

आनंदरावः मी काय म्हणतोय ते ऐका जरा. माझी खात्री झालीय की, आपल्या चाळीतल्या वातावरणातच बिघाड झालाय काहीतरी. आवाज कुठून कसे यावे याचे नियमच विस्कटून गेल्यासारखं काहीतरी झालंय -- आवाजाची एक नेहमीची यंत्रणाच कुठं तरी बिघडलीय. नाही तर, असं कसं होईल --? ( यावर पुन्हा कोलाहल सुरू --)

वाटवे : रात्री पावणेबारा वाजता तुमचं प्राध्यापकी भाषण ऐकायला जमलेलो नाही आम्ही इथं.--

आनंदरावः अहो पण, खरंच --

गाडगीळ : हे बघा, काय जो बिघाड असेल तो असेल -- पण त्याचा केंद्रबिंदू या घरातच आहे हे नक्की !--

आनंदरावः ( संपूर्ण थकून माघार घेत -- आणि खुर्चीत बसत-- ) मी तर जे खरं सांगता येईल ते सांगितलं -- आता काय करायचं ते ठरवा तुम्हीच-- हे सगळं जे घडतंय त्यात माझा -- आमच्या घराचा -- काहीही दोष नाहीय -- अगदी नमस्कार करून विनंती करतो मी तुम्हाला -- जरा विश्वास ठेवा शक्यतो --

वाटवे : ते काही नाही. मोरेकाका, आता असं करायचं -- तुम्ही इथंच थांबायचं --आम्ही जातो सगळे बाहेर -- दोनचार दोनचार जणांच्या गटांनी आम्ही बाहेर थांबतो -- तुमच्यावर सगळ्यांचा विश्वास आहे --तुम्ही थांबा इथं -- म्हणजे आता किंचाळी फोडणाऱ्या माणसाला बरोबर पकडू आपण.

गाडगीळः अहो, आता हे स्वतः किंचाळतील आणि मोरेकाका किंचाळले म्हणून सांगतील. काही नेम नाही --

वाटवे : मोरेकाकांच्यावर असा आरोप करायला दहा जन्म घ्यावे लागतील त्यांना -- चला --काय पटतंय ना मोरेकाका ?

बरेचजण : हं ! हे ठीक आहे -- काहीतरी एकदा निकाल लागू द्या याचा -- दर थोड्या थोड्या वेळानं हे सगळं चाललंच आहे -- बघू या तरी -- रात्र एवीतेवी खराब झालीच आहे आता -- ( ही वाक्ये अर्धवट -- निरनिराळे लोक बोलतात. हळूहळू पांगतात. जाताना काहीजण हसत जातात. आता गर्दी गेलेली. पण बाहेर लोक गटागटाने उभे. मधूनच त्यांचं खिदळणं, बोलणं यांचे अस्पष्ट आवाज. सगळ्या घरांतले दिवे चालू.)

आनंदरावः बसा मोरेकाका. सबंध चाळीनं ठरवलंय त्याच्या काही मी विरुध्द नाही. बसा -- ( मोरेकाका खुर्चीत बसतात. सतीश वैतागतो -- आणि जाऊन आपल्या अंथरुणावर पडतो. जरा वेळाने चक्क झोपी जातो. उषाताई, वीणा ताटकळत बसून. आनंदरावही बसलेले. शांतता. घरात कुणीच काही बोलत नाही. फक्त बाहेरचे अस्पष्ट आवाज. जरा वेळाने मंदार येतो. आता कुणीही यावे - जावे अशी घराची अवस्था. मंदार येतो आणि भिंतीवर, जमिनीवर वगैरे टिचक्या मारून किंवा बोटांची हाडे आपटून आवाज करून पाहतो. मग एका भिंतीला कान लावून भिंतीवर आवाज करून पाहतो. मग --)

मंदार : मोरेकाका, प्लीज बसल्याबसल्या जरा भितीवर टिचक्या मारा हो --( मोरेकाका नाइलाजाने टिचक्या मारतात. तो भितीला कान लावून ऐकतो आहे. नंतर बाहेर जातो आणि छतापर्यंत हात पोचेल असा लाकडी घोडा दोघांच्या मदतीने आत आणतो. त्यावर चढून छतावर आवाज करून पाहतो. नंतर तो घोडा घेऊन तिघेही बाहेर जातात. जरा वेळाने एक चाळकरी येतो. आत डोकावून जातो. जाताना ' अगदी शांत बसलेत !' असं म्हणत जातो -- बाहेर कुणीतरी हसतं.)

आनंदरावः मोरेकाका, तुम्हाला सगळयांना उगीचच त्रास होतोय हा - माझ्यामुळे त्रास होतोय असं तुम्हाला सगळ्यांना वाटतंय त्याबद्दल खरंच वाईट वाटतं मला -- खरं तर इथून कुणीच किंचाळत नाहीय -- कशाला ताटकळत बसता उगीच --

मोरेकाकाः असू द्या हो --त्रास कसला त्यात -- तुम्हालाही अशा वेळी जरा आधार देणं कर्तव्यच आहे की आमचं -- काय आहे ते एकदा कळलं तर बरं !-- ( पुन्हा जरा वेळ शांतता. फक्त बाहेरचे अस्पष्ट आवाज...)

उषाताई : चहा करू ? ( आनंदराव स्तंभित झाल्यासारखे नुसते पाहतात --)

मोरेकाकाः छे, नको -- रात्री चहा घेतला की, पुढं चार दिवस झोप उडते माझी--

आनंदरावः घरकामात नसताना फार वेळ जागं राहणं कधी जमायचं नाही तिला !

उषाताई : बरं, राह्यलं ! म्हटलं, कधी नव्हे ते मोरेकाका थांबलेत इतका वेळ आपल्याकडे --

मोरेकाका : नको, नको.

उषाताई : ( अंथरुणाकडे जात --) पडावं बाई जरा -- काय चाललंय एकेक --( म्हणत जरा सावरून -- संकोचानं का असेना पण पडतात. वीणाही उठते आणि एक चादर आणि उशी घेऊन आतल्या खोलीत जाते. मग विजय येतो.)

विजय : मोरेकाका, झोप येत नाहीय ना तुम्हाला ? वाटवेकाकांनी विचारायला संगितलंय.

मोरेकाकाः नाही, नाही, जागा आहे म्हणावं मी.( विजय जातो, जरा वेळानं तो गेला तिथे हास्याचा स्फोट होतो. पुन्हा शांतता.)

आनंदरावः असं किती वेळ ताटकळत बसणार तुम्ही मोरेकाका ! एखादेवेळेस आता किंचाळी फुटायची सुध्दा नाही --

मोरेकाकाः न का फुटेना -- मी इथं बसल्यानं जर जगातल्या किंचाळ्या थांबत असतील, तर बरंच आहे की -- आणि त्यावरूनही काही अंदाज येऊ शकेलच --

आनंदरावः म्हणजे आता समजा किंचाळी आलीच नाही -- तर तुम्ही इथं बसलाय म्हणून मी किंचाळलो नाही असं समजणारं काय तुम्ही ? हे कठीणच आहे.

मोरेकाकाः आता असं आहे - कधी तरी आपल्याला या किंचाळी प्रकारावर पाळत ठेवावी लागणारच आहे की नाही ? जाईल एक रात्र अशी ! आहे काय त्यात ? बरं, तुम्ही इतकं दाताच्या कण्या करून सांगत असताना -- आम्हाला तरी एकदम तक्रार नोंदवणं कसं बरं वाटेल ?

आनंदरावः अहो, पण आता समजा मी किंचाळलो तुम्ही असताना -- तर हा सगळा खेळ माझाच आहे असं तुम्ही समजणार - आणि नाही किंचाळलो तरी तसंच समजणार -- मग कशाला त्रास घेताय उगीच ?

मोरेकाकाः नाही - असंच काही वाटत नाही मला -- प्रत्यक्ष अनुभवाचा पुरावाही कधी तरी लागणारच हो --

आनंदरावः हं -- ( आता दोघेही गप्प. काही क्षणांनी वाटवे येतात.)

वाटवे : मोरेकाका, बाहेर बोलताबोलता काही शंका निघाल्यात. त्या मुद्दाम तुम्हाला सांगायला आलोय -- म्हणजे त्या लक्षात घेऊन तुम्हाला नीट लक्ष ठेवता येईल --( मोरेकाका पाहताहेत --) विचार असे आहेत --एकतर मुद्दाम आनंदरावांनी हा खेळ चालू केलेला आहे किंवा मधून मधून त्यांना कसला तरी झटका येत असावा आणि त्या भरात ते किंचाळत असावेत -- आणि नंतर -- आपणच किंचाळलो हे त्यांना कळत नसावं. हा एक भाग झाला. दुसरा भाग असा आहे की, यांना निरनिराळ्या आवाजांतही किंचाळता येण्याची शक्यता वाटतीय काहीजणांना--तेही लक्ष ठेवलं पाहिजे आणि तिसरा महत्त्वाचा भाग असा की-

आनंदरावः असे किती भाग आहेत ?

वाटवे : तर तिसरं असं की -- म्हणजे, विशेषतः मघाच्या प्रकारावरून लोकांना असं वाटतंय की, घरातल्या लोकांना आवाज लांबून आल्यासारखा वाटावा अशा पध्दतीनंही आनंदराव किंचाळत असतील -- त्यामुळं घरातल्या लोकांचा त्यांच्यावर विश्वास बसतो -- सांगायचा उद्देश इतकाच की, नजर अजिबात न हलवता त्यांच्यावर लक्ष ठेवणं आवश्यक आहे --

मोरेकाकाः हं --

आनंदरावः आता चौथा एक शेवटचा भाग असा सांगून टाका की -- स्वतः तोंड न उघडता आणि आवाज न काढता -- असंही मी किंचाळत असण्याची शक्यता आहे -- वाटवे --

वाटवे : ( आनंदरावांच्या बोलण्याला किंमत न देता -- मोरेकाकांना --) बरं जातो मी -- काही घडलं तर लगेच येतोच आम्ही -- ( जातात. )

आनंदरावः हा चौथा भाग चिडून बोललोय मी -- पण मोरेकाका तोच सगळ्यात खरा आहे -- आमच्या घरातली माणसं बघा ही -- प्रसंग काय चाललाय - पण झोपलेत बघा कसे सगळे -- अशा घरातला माणूस किंचाळेल, नाही तर काय करेल ? --

मोरेकाका : घरातलं कशाला सांगताय उगीच मला ? ते जाऊ द्या --

आनंदरावः बरं ते जाऊ द्या, मोरेकाका -- पण आता रात्रभर नुसतं असं एकमेकांकडे बघत कसं बसायचं आपण -- बाहेर काहीजणांनी पत्ते चालू केलेले दिसतायत -- आपण बुध्दिबळ खेळायचं का ?

मोरेकाकाः तुम्ही खेळायच्या मूडमध्ये दिसताय अजून -- मला काही इच्छा नाही --

आनंदरावः हं -- ( काही क्षण असे जातात. मग एक चाळकरी येतो.)

चाळकरी : ( आनंदरावांना --) असं किती वेळ जागवणाराय तुम्ही सगळ्यांना ?

आनंदराव: अहो, मी कुठं काय म्हणतोय -- जाऊन झोपा जावा की --

चाळकरी : ( ओरडतो ) मग किंचाळून मोकळे का होत नाही तुम्ही लौकर ? ( त्या आवाजाने एकदोन माणसे येऊन उभी राहतात. आनंदराव स्वस्थ --)

मोरेकाका: अशी किंचाळायची सत्ती बरोबर नाही हं -- तुम्ही चला बघू बाहेर. ( चाळकरी संतापलेला; पण नाईलाजाने बाहेर जातो. दुसरे दोघे हसत जातात.)

आनंदराव: माझ्या आता लक्षात आलंय की, तुम्ही माझा संशय घेऊनच जागे राहिला आहात -- दुसरं काही नाही -- मग बसा जागत -- मी जागं राह्यची काही आवश्यकता नाही --

मोरेकाका: अहो, असे रागावता काय आनंदराव ? सुदैवानं आलीच समजा दुसरीकडून किंचाळी, तर तुम्हीही सुटाल की नाही यातून -- आणि दोनतीनदा हे प्रकार झालेत आणि तेही थोड्या वेळात म्हटल्यावर, आशा सोडायचं काही कारण नाही ... तास--सव्वा तास होऊन गेलाय -- येईलही एखादी किंचाळी पंधरावीस मिनिटांत.

आनंदराव: ठीक आहे. तुम्ही एवढे बसायलायत जागत -- एक माणुसकी म्हणून तरी, मलाही जागं राहिलंच पाहिजे.

मोरेकाका: खरं आहे.( काही क्षण गेल्यावर एक चाळकरी पत्ते खेळता खेळता दाराशी येऊन उभा राहतो. तिथूनच पाहून बाहेरच्या लोकांकडे बघून ' अजून काही नाही ' अशी खूण करतो -- हशा -- चाळकरी जातो.आता मोरेकाका नकळत जमिनीवर पावलाचा ठेका धरून बसलेले. त्यांच्या पावलांचा एका ठेक्यात आवाज. मंदार कानाला स्टेथॉस्कोप लावूनच प्रवेश करतो. एका भिंतीजवळ जातो आणि भिंतीवर स्टेथॉस्कोप लावून ऐकतो. थोडा चकित झालेला. )

मंदार : मोरेकाका मजा बघा, भिंतीतून चक्क छातीच्या ठोक्यांसारखे ठोके ऐकू येतायत -- बघा तर --

मोरेकाका: ठोके ऐकू येतायत ? अस्सं ! ( पाऊल थांबवून -) आता बघ -- आता नाही ऐकू येणार --

मंदार : ( पुन्हा पाहून --) होय ! आता बंद झाले. हे कसं काय !

मोरेकाका: ( त्याचं लक्ष वेधून, पाऊल चालू करत --) आता चालू झाले बघ ठोके -- ऐक -- ( मंदार नर्व्हस होऊन जातो. मोरेकाका पाऊल थांबवतात. पुन्हा शांतता.)

एक चाळकरी: ( बाहेरच) जा हो तुम्ही, गाडगीळ. आता तब्येतीलाच जागरण झेपत नाही त्याला तुम्ही तरी काय करणार -- जा तुम्ही --

काहीजण: होय तर काय - आम्ही आहोतच की --

गाडगीळ : ( आनंदरावांच्या घराकडे येत --) होय -- जातो, पण आनंदरावांना -- मोरेकाकांना सांगून जातो. ( आत येतात. आनंदरावांना --) आनंदराव, मी जातो जरा -- कारण मला काही जागरण झेपत नाही तब्येतीला -- गैरसमज करून घेऊ नका -- तसं शेजारधर्माला जागणाराच आहे मी --

आनंदराव: अहो, जा की ! उलट मी तर सगळ्यांनाच म्हणतोय की, हा त्रास घ्यायची खरंच आवश्यकता नाही --

गाडगीळ : बरं, मोरेकाका, मी जाऊन झोपतो आता -- फार जागलो तर त्रास होईल मला --

मोरेकाका: ठीक आहे, जा तुम्ही.

गाडगीळ: नाही, म्हणजे दुसरं काही नाही - या प्रसंगाचं गांभीर्य खरंच मोठं आहे -- उद्या आमच्या घरातून आली समजा किंचाळी, तर मला लागतील का नाही चार माणसं -- अं -- म्हणजे समजून घ्या तुम्ही. तेव्हा कृपया असं म्हणू नका की, नाही तरी आनंदरावांच्या किंचाळीला गाडगीळ कुठं थांबले होते -- मग त्यांच्या किंचाळीला आपण कशाला जायचं-- असं नको व्हायला --

मोरेकाका: नाही हो गाडगीळ, जा तुम्ही.

गाडगीळ: बरंय आनंदराव -- सकाळी पुन्हा येतोच.

आनंदराव: या --

गाडगीळ : बरंय मोरेकाका.

मोरेकाका: हं--( गाडगीळ जातात. )

आनंदराव: ( जरा वेळानं --) खरं तर मोरेकाका, इतकी वर्षं एकत्र राहतोय आपण चाळीत. पण अजून आपण एकमेकांना ओळखत नाही -- मी किंचाळ्या फोडत असेन असं वाटतं तरी कसं तुम्हाला --

मोरेकाका: आनंदराव, हे तुमचं बरोबर नाही. अहो, काही गोष्टी आपल्याला नकळतही घडू शकतात की नाही ? आता मघाची ती किंचाळीच घ्या -- सगळ्या जगानं ऐकली ती -- पण तुम्हाला ऐकू आली का ? --

आता हे सगळं का होतंय ते कळायला नको का ?-- मग याला आम्ही जरा केली मदत -- लावला हातभार, तर इतकं वाईट कशाला वाटून घेताय ?-- हा फक्त तुमचाच प्रश्न आहे असं का समजताय तुम्ही ? आपण शत्रू का आहोत एकमेकांचे ?

आनंदरावः हं - हेही बरोबरच आहे म्हणा -- बसू या. बरोबर आहे -- नशिबात असेल तर, होऊनही जाईल उलगडा -- लौकरात लौकर एखादी किंचाळी ऐकू आली तर बरं होईल -- च्यायला, काहीतरी विचित्रच चाललंय मात्र सगळं --

मोरेकाकाः बघू या हो -- प्रयत्न तर करू -- नाहीतर राह्यलं ! उद्या !

आनंदरावः म्हणजे उद्या परत ?

मोरेकाकाः बघू या हो -- ( काही क्षणांनी मोरेकाका जांभई देतात. चुकून आवाज जरा मोठा येतो. दोनचार लोक पळत येतात. त्यांना पाहून --) काही नाही-- मी जांभई दिली जरा -- पण आहे -- जागा आहे मी -- ( लोक जातात. आता फ्लिकरचा वापर करून बराच वेळ जात असल्याचे सूचित करावे --या काळात निरनिराळ्या चाळकऱ्यांची निरनिराळ्या पध्दतींनी ही वाक्ये घ्यावी --' बसलेत नुसते थंड', ' आज काही नाही बहुतेक', ' गाढवा सारखी चालीय नुसती रात्र ' छया !', 'हॅ !' वगैरे. आता पत्ते वगैरे थांबलेले. बाहेरचे हळूहळू आत येऊन बसलेले -- काही पेंगुळलेले -- थकलेले. त्यातही शक्ती एकवटून तग धरूनमंडळी आनंदरावांकडे पाहात बसलेली. आनंदराव गप्प बसलेले. मोरेकाकाही निश्चल बसलेले. आनंदरावांच्या कृपेवर अवलंबून असल्यासारखा भाव काहींच्या चेहऱ्यांवर. जणू आनंदरावांनीच बांधून ठेवल्यासारखे लोक बसलेले. आनंदराव एखाद्या जुलुमी राजाप्रमाणे तटस्थ बसून. फ्लिकर थांबल्यावरच्या वातावरणात हे सर्व दिसावे. काहीही झाले तरी माणसे तशी चिवट, असे वाटण्यासारखे हे दृश्य. काही क्षण नुसते हे पेंगुळलेपण प्रस्थापित करावे. सगळेच वाट पाहून कंटाळून गेलेले. एखाद दुसरा तसाच भिंतीला टेकून घोरू लागलेला. सुरुवातीला एकदोघांचे त्या घोरण्याकडे लक्ष जाते. पण नंतर ते गृहीतच धरून माणसे बसून राहतात. त्यातल्या त्यात बैठक सुखावह करणे, थोडे कलंडणे वगैरे प्रयत्न. अक्षरशःबिनतोड परिस्थिती..)

एक चाळकरीः ( घड्याळात पाहत --) साडेतीन वाजून गेले -- ( जांभई देतो . पुन्हा स्वस्थता. शांतता. झोप टाळत राहण्यातला थकवा आणि कंटाळा -- असे काही क्षण गेल्यावर आनंदराव उभे राहतात. लोक आहे त्या स्थितीतूनच आतुरतेने पाहातात. एक दोन क्षण असेच ...)

आनंदरावः फार वेळ अशी किंचाळी दाबून कशाला ठेवायची ? मलाही ते सहन होणार नाही. माझी किंचाळी हवीय ना तुम्हाला -- फोडतो मी किंचाळी -- फोडतो --( ही उत्साहवर्धक बातमी झोपेची आवरणं तोडून लोकांच्या डोक्यांत पोचायला जरा वेळ लागतो. पण एकदा डोक्यांत पोचल्यावर अचानक एक उत्साहाची लाटच येते. माणसे उभी राहतात. एकमेकांना जागे करतात.'फोडतो म्हणतायत किंचाळी--' वगैरे बोलतात. ' बरं झालं एकदाचं--' म्हणतात. ही आनंदवार्ता काहीजण बाहेर पोचवतात. ज्योतीने ज्योत लावल्याप्रमाणे हळूहळू वातावरण चैतन्यमय होते. बाहेरून काही माणसे आत येतात. आतली काही माणसे बाहेर जातात. उत्साह आणि घाई--गडबड वाढते. माणसांचे आवाज वाढतात. गर्दी वाढते. एकजण तर, वाढत्या गलबल्यात बाहेरून येताना चक्क शिट्टी वाजवतो. लोक म्हणजे अत्यंत दुःखद प्रसंगातून बाहेर काढल्यासारखे उपकृत आणि आनंदी.)

मोरेकाकाः आनंदराव तुम्ही किंचाळी फोडतो म्हणताय -- पण कशासाठी ?

आनंदरावः काही नाही -- माझ्या स्वतःच्या आनंदासाठी. इतकी दडपणं तरी हवीयत कशाला ? किंचाळून एकदा मन तरी मोकळं करून घेतो --

मोरेकाकाः ठीक आहे. एका दृष्टीनं हेही बरंच आहे. शिवाय तुम्ही स्वतः स्वतःची म्हणून कबूल केलेली आणि सर्वांसमक्ष फोडलेली किंचाळी असते तरी कशी, हेही कळून येईल सगळ्यांना -- म्हणजे नंतर गैरसमज तरी होणार नाहीत --( वाटवे, विजय, मंदार इ. मंडळी आहेत. हसण्याचे त्राण बऱ्याच लोकांमधून गेलेले. पण काही उत्साही लोक सुहास्यवदन. )

मोरेकाकाः हे बघा. काहीजण खाली थांबा --( वीणा आणि उषाताई येऊन उभ्या राहिलेल्या. सतीश अजून झोपलेला.)आणि यांचा किंचाळीचा आवाज ऐकून कुणी वर यायला लागलं तर -- काही नाही, नाटकाची तालीम चाललीय असं सांगा --

उषाताईः म्हणजे खरंच किंचाळणार आहात तुम्ही ?

वीणा : हे काय नाना !

आनंदरावः होय. किंचाळणार आहे. आता किंचाळीच्या आधीच जाग्या झाला आहात माझ्या सुदैवानं, तर ऐका फक्त -- किंचाळी न फोडण्याचा तुमचा सल्ला नकोय मला.

मोरेकाकाः मंदार, तू आणि विजय -- दोघे खाली थांबा, अं -- ( ते दोघे जातात. विजय जरा नाखुशीने जातो.) हं -- आता सगळे शांत व्हा जरा -- बोलू नका -- हं -- अहो थांबा जरा -- हं, आनंदराव -- फोडा आता -- ( आनंदराव एकेक पाऊल टाकत मधोमध येतात. एक दोन क्षण ... मंडळी कानांवर हात ठेवायला सुरुवात करतात. उषाताई आणि वीणाही कानांवर हात ठेवतात. आनंदराव तोंड उघडतात तेव्हा सगळ्यांचे कानांवर घट्ट हात. आनंदराव किंचाळी फोडायला जातात,. पण आवाज फुटत नाही. त्यांची दृष्टी तिरकी स्थिर होते. आणि एकदोन गचके खाऊन ते कोसळतात. ते पाहून मोरेकाका ‘ पाणी -- आणा --’ म्हणतात. जरा धावपळ, कुणीतरी पाणी आणते. उषाताई दोन पावले पुढे येऊन अधीरपणे काळजीयुक्त पाहात उभ्या. वीणा तशीच घाबरून उभी. मोरेकाका कुणीतरी आणलेले पाणी आनंदरावांच्या तोंडावर शिंपडतात. काही परिणाम होत नाही. हात-छाती वगैरे पाहतात.)

मोरेकाकाः पाण्याचा उपयोग नाही आता -- चादर--चादर घ्या --( वीणा रडायला लागते. उषाताई स्तंभित होऊन उभ्या. कुणीतरी चादर आणतें. दोन बाजूंना धरून चादर टाकायला सुरुवात. क्षण-दोन क्षणांत उषाताईंचा बांध फुटतो आणि त्या जोरात किंचाळतात - आणि कोसळतात. लगेच तिकडे पळापळ. या किंचाळीने सतीश जागा झालेला. उठतो. पाहतो. आनंदराव पडलेले आहेत तिथे जातो. चादरीपलिकडे पहायला जातो. तेव्हाच आनंदराव उषाताईंच्या किंचाळीने उठून बसलेले. ते चादर खाली करून वर सतीशकडे पाहतात --)

आनंदरावः (सतीशला-) काय झालं ? कोण किंचाळलं ? ( फ्रीझ... पडदा पडत जातो...)

<u>अंक दुसरा समाप्त</u>



पत्ताः- चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.,
चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११००९

**दूरध्वनीः २४२२ ७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.**